








नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका










महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत
व प्राज्ञपाठशाला मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ३५ । अंक ४ । जानेवारी १९८२
किंमत २ रुपये । वार्षिक वर्गणी १८ रुपये

---



---

संपादक

मे. पुं. रेगे

---

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दिक्षीत,
व्यवस्थापक 'नवभारत' मासिक,
द्वारा : दि प्राज्ञ प्रेस, वाई-४१२ ८०३.
( जि. सातारा )

अनुक्रमणिका








# नवभारत

जानेवारी १९८२

अ नु क्र म


संपादकीय

पेशव्यांचा रमणा १
—अंबादास माडगूळकर

विकसनशील देशात वैज्ञानिक आणि तांत्रिक कुवतीचे संवर्धन कसे करता येईल? काही समस्या ८
—प्रा. अब्दुस सलाम व प्रा. बी. एम्. उदगावकर ह्यांच्यातील चर्चा; अनु. मे. पुं. रेगे.

आंतरजातीय विवाह : एक शास्त्रीय दृष्टिकोण २६
—ल. वि. कुलकर्णी

नोबल पारितोषिके : १९८१ ३३
—अशोक नारायण ठाकूर

महाराष्ट्रातील राजकीय परिवर्तन व सत्याग्रही शिंदे ४३
—रा. ना. चव्हाण

ग्रंथ-परीक्षणे ५०
—'बॅटल ऑफ खर्डा : चॅलेंजिस अँड रिस्पॉन्सिस', आपले काम आपले जीवनसर्वस्व.

वाचकांचा पत्रव्यवहार ५३

सार-संकलन ५७


## लेखक-परिचय


★ अंबादास माडगूळकर : समाजशास्त्राचे प्रपाठक, छत्रपती शाहू सेंट्रल इन्स्टिटयूट ऑफ बिझिनेस एज्यूकेशन अँन्ड रिसर्च, कोल्हापूर. ★ बी. एम्. उद्गावकर : मुंबई येथील टाटा इन्स्टिटयूट ऑफ फंडामेंटल रिसर्चचे प्राध्यापक, नाणावलेले वैज्ञानिक व विचारवंत; होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र, टाटा इन्स्टिटयूट ऑफ फंडामेंटल रिसर्च, कुलाबा, मुंबई–४०० ००५. ★ ल. वि. कुलकर्णी : इंटरडिसिप्लिनरी स्कूल फॉर सोशल अँड कल्चरल प्रॅक्सिस ह्या संशोधन प्रकल्पावर संशोधन साहाय्यक; ५२५, नारायण पेठ, पुणे–४११ ०२०. ★ अशोक नारायण ठाकूर : मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इ. विषयांचे संपादक, विश्वकोश, वाई–४१२८०३ ★ रा. ना. चव्हाण : सामाजिक कार्यकर्ते, सामाजिक चळवळींचे चिकित्सक अभ्यासक व लेखक; १३७८ रविवार पेठ, वाई–४१२ ८०३. ★ सु. र. देशपांडे : मराठी विश्वकोशात इतिहास, राज्यशास्त्र, पुरातत्त्वविद्या इ. विषयांचे संपादक, विश्वकोश, वाई–४१२ ८०३. ★ ज. सु. चौधरी : किसन वीर महाविद्यालय, वाई येथे वाणिज्य विषयांचे प्राध्यापक व विभागप्रमुख, वाई–४१२ ८०३.

# संपादकीय

## ज्ञानभाषा

मानवी इतिहासात असे आढळून येते, की एखाद्या विशिष्ट समाजाने संस्कृतीची, विशेषतः बौद्धिक संस्कृतीची उच्च पायरी गाठल्यानंतर त्याची भाषा 'ज्ञानभाषा' म्हणून, संस्कृतीची भाषा म्हणून प्रतिष्ठा पावते. ती केवळ त्या समाजाच्या अंतर्गत व्यवहाराची भाषा राहत नाही. उच्च बौद्धिक आणि सांस्कृतिक व्यवहारासाठी इतर समाजही तिचा आश्रय घेतात. महावीर आणि बुद्ध यांनी आपली नैतिक आणि आध्यात्मिक शिकवण लोकभाषांतून दिली आणि ती लोकांच्या अंतःकरणाला भिडली. पण जैन आणि बौद्ध शिकवणीला जेव्हा तात्त्विक दर्शनांचे स्वरूप प्राप्त झाले, तेव्हा त्यांची मांडणी संस्कृत भाषेमधून झाली. ग्रीक भाषा ही केवळ 'हेलेन' समाजाची भाषा राहिली नाही. हेलेनिस्टिक युगात ती आग्नेय यूरोप, पश्चिम आशिया, उत्तर आफ्रिका या प्रदेशांतील सर्व भिन्नभाषिक लोकसमूहांची सांस्कृतिक भाषा झाली. फिलो ह्या ज्यू तत्त्ववेत्त्याने आपले धार्मिक तत्त्वज्ञान ग्रीक भाषेतून मांडले. ख्रिस्त झालेला येशू हा ज्यू होता. त्याच्या अद्भुत जन्माची, चारित्र्याची, चमत्कारांची आणि आत्मबलिदानाची कहाणी, संबंध मानवजातीचे तारण करू शकणारे शुभवर्तमान ग्रीक भाषेतून व्यक्त झाले. इस्लामी समाजाचे मूळचे साधे, रांगडे स्वरूप जाऊन जेव्हा सुव्यवस्थित, सुशासित इस्लामी साम्राज्य प्रस्थापित झाले, तेव्हा अरबी भाषा ही मध्यपूर्वेत संस्कृतीची भाषा झाली. ग्रीक तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथांची ज्यांनी अरबी भाषेमध्ये भाषांतरे केली, त्या विद्वानांची मातृभाषा अरबी होतीच असे नाही. मध्ययुगातील संत टॉमस ॲक्विनाससारखे अव्वल दर्जाचे स्कोलॅस्टिक तत्त्ववेत्ते इब्न रशीदच्या, ॲरिस्टॉटलच्या ग्रंथावरील अरबी भाष्यांचा आधार घेत. मध्ययुगात आणि आधुनिक युगाच्या सुरवातीच्या काळापर्यंत लॅटिन ही युरोपची ज्ञानभाषा होती. ज्यांची मातृभाषा जर्मन, इटालिअन, इंग्लिश, फ्रेंच इ. होती असे तत्त्ववेत्ते, पंडित, गणितज्ञ, खगोलशास्त्रज्ञ लॅटिनमध्ये आपले ग्रंथ लिहीत व परस्परांशी वादविवाद करीत. न्यूटनने आपला 'प्रिन्सिपिया' लॅटिनमध्ये लिहिला, इंग्रजीत नव्हे. कारण तो सबंध सुसंस्कृत जगासाठी, म्हणजे युरोपसाठी होता. ह्याच कारणाने लाय्प्निट्झने आपले तत्त्वज्ञान लॅटिनमध्ये (आणि फ्रेंचमध्ये) लिहिले. लाय्प्निट्झ जर्मन होता. सतराव्या आणि विशेषतः अठराव्या शतकात फ्रेंच ही युरोपची संस्कृतीची भाषा म्हणून स्थिर झाली. पण लॅटिनला पूर्वी ज्ञानभाषा म्हणून जे अनन्यसाधारण स्थान होते ते फ्रेंच भाषेला कधी लाभले नाही. कारण अठराव्या शतकापर्यंत इंग्रजी, इटालिअन, जर्मन इ. प्रादेशिक भाषा मातब्बर आणि ज्ञानसमृद्ध भाषा म्हणून विकसित झाल्या होत्या. तरीही सभ्य, नागर-व्यवहाराची भाषा म्हणून युरोपिअन जीवनात फ्रेंचला एक विशिष्ट स्थान होते. रशियन उमराववर्ग फ्रेंच भाषेमधून व्यवहार करण्यात धन्यता मानीत असे.

एखाद्या भाषेला जेव्हा ज्ञानभाषा हा दर्जा प्राप्त होतो, तेव्हा इतर भाषिक तिचा उपयोग केवळ ज्ञानग्रहणासाठी करीत नाहीत. वैचारिक आदानप्रदानासाठीही, म्हणजे नवीन

अनुक्रमणिका

ज्ञान निर्माण करण्याच्या प्रक्रियेत सहभाग घेण्यासाठीही ते तिचा वापर करतात. किंबहुना इतर भाषिक जेव्हा नवीन ज्ञानाचा शोध घेण्यासाठी, नवीन ज्ञानाची मांडणी करण्यासाठी, नवीन ज्ञानाची चिकित्सा करण्यासाठी आपापली भाषा सोडून एका समान भाषेचा आधार घेत असतात, तेव्हाच ह्या समान भाषेला ज्ञानभाषेचे स्थान प्राप्त झाले आहे असे म्हणता येईल. काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंतच्या कोणाही पंडिताने न्यायशास्त्रावर किंवा मीमांसेवर आपला ग्रंथ संस्कृतमध्ये लिहिला असता; तामीळमध्ये किंवा मराठीमध्ये किंवा बंगालीमध्ये नव्हे. कारण ज्या विद्या-परिवारासाठी म्हणून तो ग्रंथ होता त्याची संस्कृत ही समान सांस्कृतिक भाषा होती. याच कारणासाठी न्यूटनने आपला ग्रंथ लॅटिनमधून लिहिला. पण कान्टने आपले ग्रंथ जर्मनमध्ये लिहिले. ह्याचा अर्थ असा होता, की अठराव्या शतकाच्या अखेरीच्या सुमाराला युरोपची समान अशी ज्ञानभाषा उरली नव्हती. महत्त्वाच्या प्रादेशिक भाषांनी ज्ञानभाषेचा दर्जा प्राप्त करून घेतला होता. वर म्हटल्याप्रमाणे जिच्यात ज्ञान संग्रहित झाले आहे व म्हणून जिच्या आधारे ज्ञान मिळविता येते अशी केवळ भाषा नव्हे, तर नवीन ज्ञानाचा शोध घेण्याचा व्यवहार जिच्या माध्यमातून होतो अशी भाषा.

जेव्हा अनेक भिन्नभाषिक लोकसमूहांनी एक समान भाषा ज्ञानभाषा म्हणून स्वीकारलेली असते, तेव्हा ह्या इतर भाषिक समाजांचा व्यवहार अर्थात दुहेरी असतो. सर्वसाधारण लौकिक व्यवहार मातृभाषेतून चालतो आणि सर्व उच्च सांस्कृतिक व्यवहार ज्ञानभाषेतून चालतो. न्यूटन केंब्रिजमधील दुकानदारांशी इंग्रजीतून घासाघीस करीत असणार, पण गणिती प्रमेय सोडविताना तो ते लॅटिनमधून सोडवीत असे. जेव्हा एखादी भाषा रांगडी, प्राकृत भाषा ह्या स्थानापासून प्रगती करून ज्ञानभाषा हा दर्जा प्राप्त करून घेते, तेव्हा अर्थात हा भाषिक व्यवहार एकेरी होतो. सर्वच, लौकिक आणि सांस्कृतिक व्यवहार त्या भाषेतून होतो. उदा. जर्मन भाषेने लॅटिन व काही प्रमाणात फ्रेंच ह्या भाषांना दूर सारून ज्ञानभाषा हे स्थान अठराव्या शतकात प्राप्त करून घेतले. लॅटिनच्या आधिपत्याखाली असलेल्या युरोपिअन प्रादेशिक भाषा जेव्हा ज्ञानभाषेच्या पदाला पोचल्या, तेव्हा दुसरा एक प्रश्न उपस्थित झाला. तो म्हणजे ज्ञानाच्या आणि विचारांच्या आदानप्रदानाचा. युरोपिअन व पुढे बृहद्युरोपिअन विद्या-परिवार एक होता. केवळ विज्ञानच नव्हे तर ग्रीक व लॅटिन ह्या अभिजात भाषा व त्यांतील साहित्य, तत्त्वज्ञान, नव्याने उदयाला येणारी अर्थशास्त्र इ. सामाजिक शास्त्रे इ. ज्ञानाची क्षेत्रे आंतरराष्ट्रीय होती. सप्तवार्षिक युद्धाची धुमाळी माजली असतानाही इंग्लिश, फ्रेंच आणि इतर युरोपिअन वैज्ञानिक आपल्या संशोधनाच्या फलिताविषयी एकमेकांशी पत्रव्यवहार करीत. आदान-प्रदानाचा हा प्रश्न दोन मार्गांनी सोडविण्यात आला. एक म्हणजे दुसऱ्या भाषेतील महत्त्वाच्या ग्रंथांचे आपल्या भाषेत पद्धतशीरपणे भाषांतर करणे. दुसरा मार्ग म्हणजे विद्वानाने बहुभाषिक बनणे. उदा. ग्रीक भाषेच्या इंग्लिश पंडिताला जर जर्मन वाचता येत नसेल, तर त्याचे निश्चितपणे अडेल. जर्मन भाषेतील नियतकालिकात ग्रीक अध्ययनाच्या क्षेत्रात प्रसिद्ध होणारे लेख जर त्याला मुळात वाचता येत नसतील, ह्या सर्व लेखांची इंग्रजीत भाषांतरे होण्यावर जर तो पुरता अवलंबून असेल तर तो मागे पडेल.

ज्ञानभाषा म्हणून, म्हणजे नवीन ज्ञानाच्या शोधाचे आणि नवीन ज्ञानाच्या प्रसिद्धीचे माध्यम हे स्थान जर एखाद्या भाषेला मिळायचे असेल तर त्याची अट अशी, की त्या ज्ञानाविषयी आस्था असलेले, ते समजून घेऊ शकणारे, नवीन ज्ञानाची चिकित्सा करू शकणारे लोक त्या भाषासमूहात पुरेशा संख्येने असले पाहिजेत. लोकमान्यांनी आपले 'गीतारहस्य'

मराठीत लिहिले, पण ' ओरायन ' आणि ' धि आर्क्टिक होम ऑफ् धि वेदाज ' ही पुस्तके इंग्रजीतून का लिहिली ? प्राचीन भारतीय संस्कृती आणि इतिहास हा लोकमान्यांच्या जिव्हाळ्याचा व अभिमानाचा विषय होता. पण भाषिक व इतर पुराव्यांचे विश्लेषण करून प्राचीन मानवी संस्कृतीच्या इतिहासाचा वेध घेण्याचा प्रयत्न करणारे नवीन शास्त्र ही युरोपची निर्मिती होती. लोकमान्यांच्या नवीन संशोधनाचे मूल्यमापन करू शकतील, त्यात जे ग्राह्य आहे त्याचा स्वीकार करतील अशी अधिकारी मंडळी बहुसंख्येने युरोपमध्ये होती. आणि त्यांच्यापर्यंत पोचण्याचे लोकमान्यांना उपलब्ध असलेले माध्यम केवळ इंग्रजी भाषा हे होते. आपले संशोधन त्यांनी मराठीतून प्रसिद्ध केले असते तर ते असून नसल्यासारखे झाले असते. त्याने ज्ञानात भर पडली नसती. कारण ज्ञान पुस्तकात नसते, ते जाणकारांच्या आणि जिज्ञासूंच्या मतांत, विचारांत, त्यांच्या एकमेकांशी चाललेल्या विवादांत आणि संवादांत असते. आणि ह्या क्षेत्रात अशी सक्रिय असलेली मंडळी ज्या भाषांद्वारे हा ज्ञानव्यवहार पार पाडीत, त्या इंग्रजी इ. युरोपीय भाषा होत्या. उलट ' गीतारहस्या 'चा उद्देश महाराष्ट्रीय आणि भारतीय लोकांना जीवनाविषयी एक नवीन दृष्टी देण्याचा होता. पारंपरिक अध्यात्म्याला नवीन आशय देण्यासाठी म्हणून परंपरेने पूज्य आणि अधिकारी मानलेल्या ग्रंथांचा नवीन अर्थ लोकमान्यांना लावायचा होता. मराठी भाषा हे ह्या विचारांचे स्वाभाविक माध्यम होते. कारण ही आध्यात्मिक परंपरा संस्कृत आणि मराठी भाषांच्या द्वारा टिकून राहिली होती. आजसुद्धा मराठी वैज्ञानिकाने अणु-विज्ञानात जर नवीन शोध लावला तर तो स्वाभाविकपणे आपला शोध इंग्रजीतून प्रसिद्ध करील. मराठीच्या अतिरेकी अभिमानामुळे त्याने तो मराठीत प्रसिद्ध केला तर त्याचे कृत्य हास्यास्पद ठरेल. कारण तो शोध ठरणार नाही. तो ज्ञानाच्या आखाड्यात उतरला आहे असे होणार नाही.

कान्टने आपला ' क्रिटिक ऑफ् प्युअर रीझन ' जर्मनमध्ये प्रसिद्ध केला ह्याचा अर्थच असा, की तत्त्वज्ञानाचे अध्ययन, तत्त्वज्ञानात नवीन विचार करणे, नवीन विचाराची चिकित्सा करणे हा व्यवहार जर्मन भाषेमध्ये रूढ झाला होता. तत्त्वज्ञानाचा जर्मनभाषिक परिवार पुरेशा संख्येने निर्माण झाला होता आणि त्याला उद्देशून कान्ट आपले लिखाण करीत होता. शिवाय कान्ट आणखी एक गोष्ट गृहीत धरीत होता. ती ही, की जर्मन भाषेद्वारा तो तत्त्वज्ञानाच्या सबंध युरोपिअन परिवाराशी संबंध ठेवू शकत होता. कारण जर्मन वाचू शकणारे पुरेसे अन्य-भाषिक युरोपिअन तत्त्वजिज्ञासू होते आणि त्याच्या लिखाणाची गुणवत्ता पुरेशी असेल तर त्याचे अन्य भाषांत भाषांतर अटळपणे होणार होते. ज्या ह्यूमने कांटला जागे केले त्याचे ग्रंथ कान्टने जर्मन भाषांतरामधून वाचले होते. एकोणिसाव्या शतकात एखाद्या डॅनिश, किंवा स्कँडिनेव्हियन तत्त्ववेत्त्याने किंवा पोलिश किंवा हंगेरियन तत्त्ववेत्त्याने आपले महत्त्वाचे वैचारिक ग्रंथ जर्मन भाषेत प्रसिद्ध केले असते. कारण त्याशिवाय तो सबंध सुसंस्कृत जगाला —म्हणजे सबंध युरोपला— उद्देशून बोलू शकला नसता. ह्या व्यवहारात ज्ञानाला महत्त्व असते, भाषिक अहंकाराला नव्हे. अर्थात ललित साहित्याची गोष्ट वेगळी आहे.

एका सुसंस्कृत भाषेच्या आधिपत्याखाली जेव्हा इतर भाषा असतात, तेव्हा तुलनेने ह्या इतर भाषा असंस्कृत, अशिष्ट ठरतात यात शंका नाही. आणि ह्याचे वैषम्य ह्या इतर भाषिकांना वाटणेही स्वाभाविक आहे. पण एक वरचढ भाषा इतर कमकुवत भाषांवर, ह्या भाषा बोलणाऱ्या समूहांवर लादली जाते एवढेच ह्या परिस्थितीचे वर्णन करणे एकांगी व अन्याय्य ठरेल. लॅटिन भाषा सबंध युरोपवर, उदा. जर्मन भाषिकांवर लादली गेली ती अर्थात रोमन साम्राज्यामुळे. पण ग्रीक भाषा हेलेनिस्टिक युगात इतर भाषिकांमध्ये

संस्कृतीची भाषा म्हणून पसरली ती केवळ शिकंदर बादशहाच्या पराक्रमामुळे नव्हे. ही परिस्थिती निर्माण करण्यात होमरचा, प्लेटो-ॲरिस्टॉटलचा, सबंध ग्रीक बौद्धिक परंपरेचा मोठा हातभार होता. ज्ञान आणि साहित्य यांनी समृद्ध असलेली, अमूर्त, सूक्ष्म विचार सुरळीतपणे, अलगपणे व्यक्त करण्याची ताकद कमावलेली भाषा म्हणून ग्रीक भाषा इतर भाषिकांपुढे होती. उच्चतर बौद्धिक संस्कृतीचे माध्यम म्हणून ती त्यांना आवाहन करीत होती, ही संस्कृती त्यांना विलोभनीय वाटत होती, तिच्याद्वारा ही संस्कृती ते आत्मसात करीत होते आणि ती आत्मसात केल्यानंतर स्वत:च्या पारंपरिक संस्कृतीचा मागासलेपणा त्यांना स्पष्ट होत होता. रोमन साम्राज्याने ग्रीसचा पाडाव केला, पण ग्रीक बौद्धिक संस्कृती उच्चतर संस्कृती म्हणून रोमन उच्च वर्गीयांनी स्वीकारली, तिने विकसित केलेले बौद्धिक व कलात्मक निकष स्वीकारले आणि ह्या सर्वांचे माध्यम म्हणून ग्रीक भाषाही स्वीकारली. लॅटिन गद्याची अभिजात शैली ग्रीक आदर्शांवर आधारली आहे.

अरबी भाषेचे वर्चस्व लष्करी आणि राजकीय वर्चस्वामुळे प्रस्थापित झाले यात शंका नाही. पण अरबी भाषेने ग्रीक विज्ञान आणि तत्त्वज्ञान आत्मसात केले आणि मगच ती उच्च संस्कृतीची भाषा म्हणून मान्य झाली. भारतात मुसलमानी अंमलानंतर फारसी भाषा वरचढ झाली, पण ती राज्यशासनाची भाषा म्हणूनच राहिली. उच्च संस्कृतीची भाषा म्हणून भारतीय पंडितांनी तिचा कधी स्वीकार केला नाही. कारण उच्च बौद्धिक संस्कृतीचे माध्यम ह्या स्वरूपात ती कोणापुढेच उभी नव्हती. इतर संस्कृतींपासून शिकण्याची भारतीय पंडितांची कुवत तेव्हा संपुष्टात आली होती ही गोष्ट अर्थात आहेच. परंतु ज्या कायस्थ इ. जातींनी राज्यव्यवहाराची भाषा म्हणून फारसीवर काबू मिळविला, त्यांनीही उच्च बौद्धिक संस्कृतीची भाषा म्हणून तिच्याकडे पाहिले नाही. सभ्य, सुसंस्कृत, उमरावी राहाणीची ती भाषा होती. पण महत्त्वाच्या ज्ञानाचे माध्यम हे स्थान तिला नव्हते. असे महत्त्वाचे ज्ञान अरबी भाषेत होते, पण ते जीर्ण झाले होते. ह्या अर्थाने जीर्ण, की त्या ज्ञानावर आधारलेली बौद्धिक परंपरा जिवंत नव्हती, खंडित झाली होती. जो मुसलमान राज्यकर्ता वर्ग भारतीय पंडितांपुढे व बुद्धिजीवी वर्गांपुढे होता त्याच्या आचरणावर, व्यवहारावर, बोलण्याचालण्यावर अरबी तत्त्वज्ञानाची, भूमिती व बीजगणित यांची, ॲरिस्टॉटलच्या तर्कशास्त्राची छाप नव्हती.

तेव्हा राजकीय आणि आर्थिक वर्चस्वामुळे एखाद्या भाषेला इतर भाषांपेक्षा वरचढ होण्याची संधी मिळते ही गोष्ट खरी असली, तरी उच्चतर बौद्धिक संस्कृती व सभ्यता आत्मसात केल्याशिवाय संस्कृतीची भाषा म्हणून ती स्वीकारली जात नाही. एकोणिसाव्या शतकातील रशियन उमराववर्गाने फ्रेंच भाषेचा संस्कृतीची भाषा म्हणून जो स्वीकार केला, त्याच्यामागे फ्रान्सचे रशियावरील राजकीय वर्चस्व नव्हते. पण फ्रेंच संस्कृतीचे श्रेष्ठत्व रशियन उमराववर्गाने मान्य केले होते आणि हे वर्चस्व ललित आणि वैचारिक फ्रेंच साहित्यावर आणि हे फ्रेंच साहित्य ज्या फ्रेंच जीवनाची निर्मिती आणि अविभाज्य भाग होता त्याच्या गुणवत्तेवर आधारले होते.

समानतेच्या युगात गुणवत्तेचा विचार कदाचित गौण ठरेल, पण पूर्णपणे गैरलागू ठरू शकत नाही.

---

# पेशव्यांचा 'रमणा'

अंबादास माडगूळकर

एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासून महाराष्ट्रात बहुजनसमाजाने जे प्रत्ययकारी आंदोलन सुरू केले, त्याचे तात्कालिक कारण तरी उत्तर पेशवाईत भ्रष्ट ब्राह्मण्याचे जे स्तोम माजले, ते एक निश्चितच होते. मराठेशाहीच्या ऐन बहरात सद्हेतूने सुरू होऊन, जे पूर्णत: विकृत अवस्थेला पोचलेले पेशवाईच्या उत्तरकाळात आपल्याला आढळते, अशा एका 'प्रकरणा'ची चिकित्सा प्रस्तुत लेखात करावयाची आहे. हे 'प्रकरण' म्हणजे ब्राह्मणांना राजाकडून मिळणारी दक्षिणा हे होय.

विद्वान ब्राह्मणांना दक्षिणा देण्याची पद्धत छत्रपती शिवाजी महाराज (१६२७–१६८०) यांनी १६७४ साली त्यांना झालेल्या राज्याभिषेकानंतर सुरू केली. अशी दक्षिणा श्रावणाच्या महिन्यात देणे विशेष पुण्यप्रद मानिले जाई. शिवशाहीत धार्मिक बाबींसाठी 'पंडितराव' या नावाचे एक वेगळे मंत्री असत. हे पंडितराव ब्राह्मणांची विद्वत्ता व त्यांची विद्यासाधनेची वृत्ती यांचा अदमास घेऊन, या दक्षिणेची शिफारस करीत, असे दिसते. छत्रपतींचे उभय पुत्र, संभाजी महाराज (१६८१–१६८९) व राजाराम महाराज (१६८९–१७००) यांनी हीच प्रथा पुढे चालू ठेविली. छत्रपती शाहू महाराजांनी (१७०८–१७४९) मात्र दक्षिणा वितरणाची ही कामगिरी सेनापती दाभाडे यांच्याकडे सोपविली. हे काम परंपरेने त्रिंबकराव दाभाडे यांच्याकडे आले. पहिल्या बाजीरावाने त्रिंबकरावाचा पाडाव केल्यावर, ही प्रथा पेशवे कुटुंबाकडे आली.[१]

वस्तुत: पेशवे हे साताऱ्याच्या छत्रपतींचे पंतप्रधान होते. छत्रपतींच्या वतीनेच त्यांनी ही कामगिरी स्वीकारली होती असे मानले पाहिजे. कारण खुद्द पेशवे आपला सेवकभाव अनेकदा छत्रपतींकडे व्यक्त करीत. पेशवाईची वस्त्रे देण्याचे अधिकार मराठेशाही बुडेतोपर्यन्त छत्रपतींकडेच होते. साताऱ्यात आले, की पेशवे पायउतार होत व रुमालाने हात बांधून छत्रपतींकडे हुजर होत. त्यांच्यापुढे साध्या बैठकीवर बसत व खवासखान्यात बसून छत्रपतींवर चवरी ढाळीत; त्यांच्या दिमतीस हुजर असत. परंतु शाहू महाराजांनंतर (१७४९) पेशवे हे जवळजवळ स्वतंत्र झाल्यासारखे वागू लागले, असे दिसते. पहिल्या बाजीरावाने (१७२०–१७४०) दाभाडे यांच्यावर १७३१ साली विजय मिळविला.[२] तेव्हा पासून ते तहत् दुसरा बाजीराव (१७९६–१८१८) ब्रह्मावर्तेस निघून जाईपर्यन्त, व दक्षिणेची प्रथाच इंग्रजांनी नष्ट करीतोपर्यन्त, सुमारे ८७ वर्षे ही प्रथा पेशवे कुळात चालली. या प्रदीर्घ कालावधीत ही प्रथा कशी भ्रष्ट होत गेली याचे स्पष्ट दर्शन घडते.

पहिल्या बाजीरावानंतर त्याचा पुत्र बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब (१७४०–१७६१) याने ही दक्षिणा देण्यासाठी एक वेगळी जागा बांधली. ही जागा पुण्यात पर्वतीच्या टेकडीच्या पायथ्याशी असून, 'रमणा' या नावाने पेशवाईत वाखाणली जाई. प्रसिद्ध शाहीर रामजोशी यांच्या 'ब्राह्मणी राज्य जोरदार' या लावणीत 'रमण्या'चा ठावठिकाणा नेमका सांगितला आहे (या रामजोशीचा काल सुमारे १७५८ ते १८१३ असा आहे).

> ...श्रीमंत पेशवे प्रधान, बहु प्रीतीचे
> अष्टप्रधानांमधि उतरले मर्जीत महाराजांचे
> वसविले त्यांनी पुणे शहर टुमदारीचे ...
> रमणाही ब्राह्मणांसाठी बांधिला केवढा
> श्रावणमासामधि खर्चतो कोट्यावधि तोडा
> पुढे तळे, त्यामधि लहान बेटाचा तुकडा
> गणपती त्यांत. पलीकडे आंबिल ओढा...[३]

वरील लावणीतील उल्लेखावरून ही जागा पर्वतीचा पायथा व तळ्यातील गणपतीस्थानाच्या दरम्यान होती हे स्पष्ट होते. या रमण्यासभोवार उंच दगडी भिंत होती, आणि मध्यभागी मैदान होते. रमण्यात प्रवेश करण्यासाठी चार दरवाजे होते. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत दरवाजे पाच झाल्याचे दिसते. या प्रत्येक दरवाजालगत 'सोपे' म्हणून इमारती होत्या. दक्षिणा-वाटपांच्या वेळी या ठिकाणी शिधा ठेविला जात असे. या इमारती

पक्क्या नसाव्यात. कारण त्यांची वारंवार दुरुस्ती करावी लागत असावी. कारण याची – "८०० रमणा पर्वतीचा नीट करण्याबद्दल केसोपंत करंदीकर यास हवाली केले" अशी दि. २७–५–१८०६ ची एक नोंद, पेशव्यांच्या रोजनिशीत आढळते.[४] बहुधा या इमारती कौलारू असल्यामुळे, त्यांना वारंवार दुरुस्ती लागत असावी. १८१०–११ सालाच्या सुमारास दुसऱ्या बाजीरावाला मुलगा झाला तन्निमित्त जी दक्षिणा व शिधा यांची खैरात ब्राह्मणांना करण्यात आली, ती रमण्यातच. परंतु हा महिना आश्विन–कार्तिकापैकी असल्याने रमण्याची वाऱ्याने दाणादाण झाली. "रमण्यातील काही छपरे वाऱ्याने तोडली, काही जमिनीवर मोडून पडली. वासे मोडून जाया झाले ..." यासाठी पुन: "दरवाजावरील मेढे व सोप्यांचीं छपरें घालावयाचे साट बांधविले, आतील चौसोपांची छपरे नीट करविली ...", व यासाठी २०० रुपये खर्च झाला.[५] या हकीकतीवरून इमारती कच्च्या व कौलारू छपरांच्या असाव्यात, या अनुमानास बळकटी येते.

श्रावणाच्या महिन्यात, या रमण्यात हिंदुस्तानातील प्रांतोप्रांतीचे हजारो ब्राह्मण गोळा होत. अपवादात्मक वर्षे सोडली तर दरवर्षी या ब्राह्मणांच्या संख्येत वाढच झालेली दिसते. युद्धे, बंडाळ्या, अवर्षणे यांचे परिणाम मात्र रमण्यावर होत होते. उदा. १७६१ साली मराठ्यांनी पानपतावर जो प्रचंड पराभव अनुभवला, त्याचे परिणाम झाल्याचे दिसतात. कारण, १७६२ साली रमण्यात फक्त, ११,८९८ रुपये वाटले गेल्याची नोंद आहे.[६]

श्रावण महिन्यात या रमण्याच्या मैदानावर राहुट्या, डेरे इ. उभारून ब्राह्मणांच्या निवाऱ्याची तात्पुरती सोय केली जात असे. रमण्यातील दरवाजापुढे शिधा आणि दक्षिणा देण्यासाठी छपरे उभारली जात. नळाने तात्पुरते पाणी आणवून ब्राह्मणांच्या पाणी पिण्याची सोय करावी लागत असे. दक्षिणा देण्याचा समारंभ रात्री उशीरापर्यंत चालत असल्याने, उजेडासाठी हवया पाची दरवाजांवरील सोप्यांवर पेटविल्या जात. विशेष प्रसंगाने रमणा भरत असल्यास, सोप्यावर चित्रे काढली जात. रात्री आतषबाजी केली जात असे. हमाल, कांडपिणी, शागीर्द, प्यादे, कोठावळे, 'दास्ताना'ची रखवाली करणारे, कर्णकरी, शिंगाडे इत्यादी लोकांची एक भली दांडगी फौजच तयार करावी लागत असे. या समारंभाचा ताण इतका अनावर असे की, हा समारंभ व्यवस्थित तडीस जावा, म्हणून गणपतीस नवस केला जाई!

या समारंभासाठी, दक्षिणी ब्राह्मणांखेरीज वऱ्हाड कर्नाटक, उत्तर हिंदुस्तान इत्यादी ठिकाणांहून ब्राह्मण येत. रावबहादुर पारसनीस यांनी वेगवेगळ्या वर्षीचे दक्षिणेचे आकडे पुढीलप्रमाणे नमूद केले आहेत :–[७]

| साल | | रुपये |
|---|---|---|
| १७३६ | ... | १६,३५४ |
| १७३७ | ... | ४९,०७३ |
| १७४९ | ... | १,२३,५३० |
| १७५२ | ... | ६,२८,३५३ |
| १७५३ | ... | २,०६,०१९ |
| १७६२ | ... | ११,८९८ |
| १७६५ | ... | १,३२,०४३ |
| १७६८ | ... | २,८८,७४५ |
| १७७६ | ... | ५,०५,१२८ |
| १७८८ | ... | २,१८,६३० |
| १७८९ | ... | २,२५,३५४ |

काळाचा विचार करता, वरील रकमा प्रचंड आहेत! सवाई माधवरावांच्या कारकीर्दीत पाच लाखांपर्यंत रक्कम दरवर्षी या दक्षिणेवर खर्च होत असे. श्रृंगेरी, कांजीवरम्, तंजावर, रामेश्वर इ. दक्षिणेकडील शहरांतून व उत्तरेकडील दिल्ली, कनोज, ग्वाल्हेर या शहरांकडील ब्राह्मण रमण्यासाठी पुण्यात येत. यांमध्ये वैदिक, वैयाकरणी, पंडित, कवी, वेदान्ती, वैद्य व साधु-संन्याशीही असत. साधारणत: दर व्यक्तीस जास्तीत जास्त एक हजार रुपये दक्षिणा मिळे. अर्थात, दक्षिणा देताना व्यक्तीच्या पात्रापात्रतेचा विचार होईच. रामशास्त्री प्रभुणे, बाळशास्त्री, अय्याशास्त्री, काशिनाथशास्त्री इत्यादी स्थानिक विद्वान या दक्षिणार्थींची परीक्षा घेत व त्यांचा वकूब ध्यानी घेऊन दक्षिणेची शिफारस होई. विद्वान ब्राह्मणांना वाड्यावर दक्षिणा सन्मानपूर्वक मिळे. सामान्य ब्राह्मणांना मात्र रमण्यात सामील व्हावे लागे. रमण्यात सर्वांबरोबर शिधा व दक्षिणा मिळे. रमण्याच्या चार दरवाजांवर अनुक्रमे खासा

पेशवे, नाना फडणवीस, रामशास्त्री, अमृतराव व पेशव्यांचे इतर अधिकारीही असत. बहुधा, सैन्य-शिबंदी खडी ठेविल्याखेरीज हे 'कार्य' पार पडत नसे.

सुरवातीच्या काळात ब्राह्मण मर्यादित संख्येने रमण्यासाठी आलेले दिसतात. उदा. पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दीत १७३६ साली फक्त 'च्यार पांच हजार ब्राह्मण आले होते,' व बाजीरावाने 'येकापासून दोन पावेतो' मर्यादित दक्षिणा दिली[८] या अगोदरच्या साली तर, म्हणजे १७३५ साली, तीन हजार ब्राह्मण होते. दक्षिणा 'रुपया दोन तीन चार पांच दहा बारा अर्धा लाहणा मुलांस' अशी मिळाली.[९] काही वर्षी तर श्रावण महिन्यात बाजीराव स्वारीवर आढळतो. "श्रावण सुध दशमी मंदवारी राजश्री पंतप्रधान घरास आले. काल संगमावर होते. आजी वाडीयांत आले" अशी १७३८ ची नोंद आहे. १७५४ सालच्या श्रावणात, बाळाजी बाजीरावानें (१७४०–१७६१) रुपये ६,७९,६८२ इतके रुपये रमण्यात वाटले आणि शिवाय १,४८,६६६ रुपयांची रक्कम वाड्यावर वाटली, अशी पेशव्यांच्या रोजनिशीत नोंद आहे. या जमाखर्चाच्या नोंदीबरोबर सुमारे पंचवीस अलाहिदे बंद असून, यांत दक्षिणा दिलेल्या लोकांची नावे आहेत. गो. स. सरदेसाई लिहितात, "तत्कालीन परराष्ट्रांतील काय, पण अखिल हिंदुस्थानांतील विद्वान लोकांची जंत्री त्यांत आहे." पेशव्यांची वाढती राज्यलक्ष्मी व विद्येविषयी आस्था या दोन्ही गोष्टी या रकमांतून व्यक्त होतात. थोरल्या माधवराव पेशव्यांच्या (१७६१–१७७२) कारकीर्दीतील "२,६०२ रुपये आजारी विद्वान् ब्राह्मणास श्रावणमासाची दक्षिणा" दिल्याची १७६७ सालची नोंद आढळते.[१०] आजारी आणि विद्वान या विशेषणामुळे दक्षिणेच्या रकमेविषयी अनाठायी खर्चाची तक्रार प्रस्तुत ठरत नाही.

१७९६ साली, दुसऱ्या बाजीरावाला पेशवाईची वस्त्रे मिळाली. तेव्हापासून मात्र दक्षिणेचा अस्ताव्यस्त प्रपंच सुरू होतो. दुसऱ्या बाजीरावाविषयी (१७९६–१८१८) लिहिताना वासुदेवशास्त्री खरे लिहितात, "पहिले बाजीराव यांनी रणशूरत्वाबद्दल दिगंत कीर्ति केली. सांप्रत हे दुसरे बाजीराव ऊर्फ सवाई बाजीराव पेशवाई पदावर विराजमान झाले होते. यावर रणशूरत्वाचा आळ कधीच कोणी घेणार नाही. तथापि आपण दानशूरत्वाचा लौकिक मिळवावा, अशी त्यांस केव्हां केव्हां लहर लागे. मात्र आपल्या लहरींत ते पैका खर्चीत त्यांत अस्ताव्यस्तपणाचा व अप्रयोजकपणाचा प्रकार सर्वदा दिसून येई."[११] रमण्यात बाजीरावाने वाटलेल्या दक्षिणेसंबंधी वरील उद्‌गार तंतोतंत लागू पडतात. हा दुसरा बाजीराव शाहीरांचा फार लाडका होता, असे दिसते. कारण कित्येक शाहीरांनी त्याच्यावर लावण्या, पवाडे इ. रचले आहेत. हे शाहीर समकालीन असल्यामुळे, दुसऱ्या बाजीरावाचे जीवन, स्वभाव समजण्यास त्यांनी केलेली वर्णने उपयुक्त ठरतात. उदाहरणार्थ–

"शके सोळाशे शहाण्णवी
अति उत्तम जयसंवत्सरी
पौष शुद्ध दशमीस भौमवासरी
ठीक पहिल्या प्रहरांत जन्मले
रात्रींच्या अवसरी...

अशी या बाजीरावाच्या जन्माची बारीक नोंद प्रभाकराने (१७५५ ते १८४३) करून ठेविली आहे.[१२] अस्तु. हा बाजीराव जितका उदार तितकाच कृपण होता, अशी अनंत फंदी (१७४४ ते १८१९) या शाहीराची नोंद आहे.

"घडीत व्हावे क्रोधयुक्त,
घडीत व्हावे आनंद भरीत,
घडीत व्हावे कृपण बहुत,
घडीत उदार कर्णापरी"

असे अनंत फंदी एका पवाड्यात सांगतो.[१३] या त्याच्या स्वभावाची चुणूक १७९६ साली भरलेल्या रमण्यात आढळते. या वर्षी रुपये १,८९,७९४ रमण्यात दिले गेले. पण कोणी एक रामाजी भदे हा शागीर्द आपल्या ओळखीच्या वशिल्यावर रमण्यातून अकरा रुपये दक्षिणा घेऊन चालला होता. खिजमतगारांनी त्याला धरून आणून सदरचे अकरा रुपये परत घेतले![१४] लक्षावधी रुपयांचे दान होत असताना, एका शागीर्दाकडून अकरा रुपये परत घेतले, यात बाजीरावाच्या हुकुमाची तामिली करणाऱ्या अधिकाऱ्याची तारीफ करण्यापेक्षा कीवच करावीशी वाटते, कारण बाजीराव आपल्या

'विलास प्रकरणा'त हजारो रुपये मुक्तपणे उधळत होता, त्याबाबत या अधिकाऱ्यांनी काय केले ?[15]

दुसऱ्या बाजीरावाने १७९६–९७ साली जी दक्षिणा रमण्यात दिली, तिचा आकडा १,४०,१४३ रुपये, असा रावबहादुर वाड यांनी दिला आहे.[16] याखेरीज, रुपये १,०७,७१३ वाड्यात वाटले व रुपये ३,२९८ दुखणेकरी ब्राह्मणांस घरोघरी नेऊन दिले.

या वर्षी रमण्याला चार दरवाजे होते व त्यावर अनुक्रमे स्वतः बाजीराव, व परशुराम रामचंद्र, यज्ञेश्वर शास्त्री, माधवराव कृष्ण पानसे, व रामचंद्र हरि फडके हे लोक विद्यमान होते. रमण्यात एकूण ३६,६१२ ब्राह्मण आले व प्रत्येकाला सरासरी ३ रुपये, १३ आणे, १ पैसा अशी दक्षिणा मिळाली. श्रावण शुद्ध षष्ठीपासून अष्टमीपर्यंत तीन दिवस हा रमणा चालू होता.

या वर्षापासून बायकांना दक्षिणा देण्याचा रिवाज नवीनच जाणवतो. ही दक्षिणा 'पागेत' दिली, अशी नोंद असून, दर बाईला एक रुपया याप्रमाणे ३,३९८ बायका व आठ आणे दर मुलास याप्रमाणे ३६५ मुले व ३६५ मुली यांना दक्षिणा मिळाली. असा एकूण ३,७६३ रुपये खर्च नवीन दिसतो. बरे सवाष्ण बायकांना म्हणून ही दक्षिणा देत म्हणावे, तर मुले आणि मुली कशासाठी ?

रमण्यामध्ये 'खिचडी' आणि 'फुटाणे' वाटले जात असे दिसते (की, हे काही रूपकात्मक शब्द आहेत ?). हे वाटप होत असताना आणखी खुर्दा व 'टके' वाटले जात. १७९६–९७ या सालामध्ये ९,७७५ रुपयांचा 'खुर्दा' लागला.

यापुढचे वर्णन १७९७–९८ सालापैकी एका सालात झालेल्या रमण्याचे आहे. यावेळी दुसऱ्या बाजीरावाने २,९२,२८५ रु. ८ आणे इतकी रक्कम रमण्यात वाटली. यासाली रमण्यात ४९,९६६ ब्राह्मण आले. १,३१,५६६ रुपयांची रक्कम गावगन्ना पाठविली, १३,२१४ रु. १४ आणे खुर्दा 'उलपया'-बरोबर व फुटाण्याबरोबर दिला, तर खिचडीसमयी नित्याची खैरात झाली.

यावेळचे वैशिष्ट्य म्हणजे रमण्याला चाराऐवजी पाच दारे झाली. प्राय: या सालीच कॅप्टन मूर या नावाचा एक इंग्रज वकीलातीचा अधिकारी कुतूहलाने रमणा पाहण्यासाठी गेला (१७९७). मूरने लिहिलेल्या वृत्तांतात काही महत्त्वाचे दुवे मिळतात.

(१) रमण्यासाठी दूरदूरच्या ठिकाणांहून जे हजारो ब्राह्मण पुण्यास येत, त्यांना रस्त्यात 'रमण्यासाठी चाललेला यात्रेकरू' म्हणून वाटेवर मदत मिळत असे. (२) जमलेल्या ब्राह्मणांची परीक्षा घेऊन दक्षिणा दिली जाई, असे म्हणणे वरकरणीच खरे होते. प्रत्यक्षात या हजारो विविध भाषी ब्राह्मणांची परीक्षा केवळ नाममात्र असावी. वशिलेबाजी आणि दक्षिणार्थींचे प्रथमदर्शनी पडणारे वजन हेच निकष होते. दक्षिणार्थी ब्राह्मणाच्या नावाचा कितपत बोलबाला आहे, हाही एक निकष असावा. (३) रमण्यात ब्राह्मण सोडतेवेळी, एका कढईमध्ये साठविलेल्या तांबड्या द्रवात हात बुचकळून, एक मनुष्य आपल्या पंजाचा ठसा ब्राह्मणाच्या वस्त्रावर अगर अंगावर मारी. (निवडणूक दालनात हाताला शाईचा ठसा लावतात, तसाच हा प्रकार असावा !) यामुळे, दक्षिणा रमण्यातून बाहेर पडताना पदरी पडत असावी, असा तर्क संभवतो. (४) रमण्यासाठी आलेल्या प्रत्येकाला दक्षिणा मिळेच. यामुळे रात्री दहा दहा वाजेपर्यन्त रमण्याचे काम चालू असे. (५) रमण्यामध्ये सरदार दौलतराव शिंदे दिसल्याचे मूर लिहितो. हे शक्य आहेच. कारण, पंतप्रधानकी सांबाने दिली आणि तिचे रक्षण सरदार शिंदे यांच्या शौर्यामुळे झाले, अशी बाजीरावाची ठाम धारणा होती. (६) बाजीराव प्रजेमध्ये लोकप्रियता मिळविण्यासाठी पैशाची उधळपट्टी करीत होता.[17]

कॅप्टन मूर हा परदेशी आणि अलिप्त निरीक्षक होता. त्याच्या लक्षात आलेल्या वरील गोष्टी खासच चिंतनीय आहेत.

१८०६ सालात मात्र रमण्यात आणि वाड्यात मिळून दिलेल्या दक्षिणेचा आकडा फक्त २५,००० आहे.[18] दक्षिणेखातर हजारो रुपये उधळणाऱ्या बाजीरावाने येथे आपला हात आखडता का घेतला? संभवनीय आहे की एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीच, सर्जेराव घाटगे (१८०१), यशवंतराव होळकर (१८०२) यांनी पुण्यात जो दंगा घातला व पुणे प्रांतात जो कहर दुष्काळ पडला (१८०४) त्याचे परिणाम दक्षिणेच्या रकमेवर झाले. (वसईचा

कुप्रसिद्ध तह करून मराठी राज्याचे उदक याच काळात बाजीरावाने इंग्रजांच्या हातावर सोडले होते!)

१८०७-८ सालात मात्र रमण्याने पुनः जोर धरला. या सालात रमण्याचा बंदोबस्त राखण्यासाठी १६६० लोकांना सनदा पाठवून बोलावून घेतले. वेगवेगळे तालुके व किल्ले यांवरून हे लोक बोलाविले. नारायणगड, सिंहगड, परळी, नांदगिरी, चंदन, चाकण, वंदन इ. किल्ले व राजमाची, शिवनेर इ. तालुके या यादीत येतात. शिवाय पंत-सचिव व पंत-प्रतिनिधि यांनाही 'पोटाची बेगमी' करून माणसे धाडावी अशा सूचना आहेत. याशिवाय आणखी दिलेल्या 'सनदा' जमेला धरल्या तर बोलाविलेले असामी १९३० च्या घरात जातात. बंदोबस्तासाठी केलेल्या तयारीवरून रमण्याच्या अवाढव्यपणाची कल्पना करता येते.

१८०८-९ सालच्या सुमारास झालेल्या एका रमण्यात चार दिवस ब्राह्मणांना जो शिधा दिला, त्याचे वर्णन आले आहे. यात सडीक आंबेमोहोर तांदूळ, तुरी डाळ, दळीव मीठ, व तूप, भाजी, लाकडे यासाठी वेगळे टक्के असा थाट आहे. विडा कसा असावा याचेही साक्षेपाने वर्णन दिले आहे. एक विडा म्हणजे पाच हिरवी पाने, एक सुपारी, दोन कातगोळ्या व चुना असा सरंजाम द्यावा लागे. दक्षिणेसाठी आलेले ब्राह्मण रमण्यात घेताना तोफांचे आवाज करून इशारा होई.

विशेष कारणाने, श्रावणाखेरीज इतर महिन्यांतही रमणा बोलाविला जाई. १८०६ साली व १८१०-११ साली बोलाविलेल्या दोन रमण्यांची उदाहरणे येथे देता येतील.

१८०६ साली दुसऱ्या बाजीरावाचे चौथे लग्न झाले. या लग्नप्रसंगी झालेल्या रमण्यातील खर्चाची नोंद बाजीरावाने स्वहस्ते करून ठेविली आहे यामध्ये १६,४१५ रु. सिधा, २५,७४४ रु. दक्षिणा व ४,८०० रु. कापड असा खर्च आहे![१९]

१८१०-११ साली 'राजेश्री बाबासाहेब यांस' पुत्र झाल्याबद्दल बारा दिवसांचा रमणा घातला गेला. प्रस्तुत लेखकाला उपलब्ध झालेल्या माहितीपैकी हा सर्वांत मोठा शेवटचा रमणा. या रमण्यासाठी ३,६६,७५३ ब्राह्मण, बायका आणि मुले यांची तैनात झाली. दिलेल्या शिध्यामध्ये पूर्वीचे जिन्नस तर होतेच; पण गहू, साखर, पत्रावळ, आमसुले यांचाही विचार झालेला दिसतो.[२०] वामनरावाच्या (या जन्मलेल्या मुलाचे नाव) जन्मोत्सवप्रसंगी पुण्यातील झाडून साऱ्या देव-देवतांना दक्षिणा पोचविण्यात आली. कुणा जिज्ञासूला १९ व्या शतकाच्या प्रारंभीची पुणे शहरातील देव-देवतांची खानेसुमारी घ्यावयाची असेल, तर ही यादी फार उपयुक्त ठरेल! या रमण्याचा एकूण खर्च १,७८,६४१ रुपये झाला.

रावबहादुर पारसनीस यांच्या म्हणण्याप्रमाणे दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत दक्षिणेची रक्कम १० लाख रुपयांपर्यंत गेली होती. १८१८ साली बाजीराव पुणे सोडून कायमचा ब्रह्मावर्तेला निघून गेला. यावेळी, एलफिन्स्टन (१८१०-१८१९) हा दूरदृष्टीचा इंग्रज मुत्सद्दी पुण्याचा रेसिडेंट होता. त्याने रमण्याची पद्धत बंद केली व १८२१ साली पुण्याला विश्रामबागवाड्यात संस्कृत पाठशाळा चालू केली. यासाठी एलफिन्स्टनने ५० हजार रुपयांची रक्कम बाजूला काढून ठेविली.[२१] दक्षिणा शिष्यवृत्ति (Fellowship) व दक्षिणा पारितोषिक (Prize) ही पेशवेकालीन दक्षिणेची अर्वाचीन रूपे होत. याबाबत पेशवाईच्या अखेरपर्यंत विद्येतून दक्षिणा निर्माण होत असे, परंतु 'पेशवाईनंतर या दक्षिणेतूनच विद्या निर्माण होण्यास सुरवात झाली,' असे मार्मिक उद्गार न. चिं. केळकर यांनी काढले आहेत.[२२]

**काही निष्कर्ष**

(१) विद्वानांना दक्षिणा देण्याची प्रथा निःसंशय गौरवास्पद होती. या प्रथेचे जनकत्व छत्रपती शिवाजी महाराज यांच्याकडे जाते. परंतु, उत्तर पेशवाईत या प्रथेचे विडंबन होत होत ती अखेर भेसूर झाली. 'विद्वान्' हा शब्द मागे पडून 'ब्राह्मण' या जन्मजात संज्ञेलाच महत्त्व आले.

(२) स्त्रिया व मुले यांना दक्षिणा देण्याची प्रथा मुळीच समर्थनीय वाटत नाही. पेशवे काळातील स्त्रिया विद्यावंत होत्या हे म्हणणे फार धाष्टर्याचे आहे. त्या दुखणाईत, गरजू आहेत असाही कोठे उल्लेख नाही. पेशव्यांनी सत्तेचा दुरुपयोग केला (विशेषतः दुसऱ्या बाजीरावाने), असे म्हणावे लागते.

(३) वैयक्तिक सुखाच्या प्रसंगी राज्यलक्ष्मीचा गैरवापर करणे योग्य वाटत नाही. लग्ने, जन्मोत्सव इ. प्रसंगी झालेले रमणे अप्रयोजकता दाखवितात. पेशवे राजसत्तेचे मालक नव्हते. केवळ चाकर होते, हे लक्षात घेतले, की ही उधळपट्टी अधिकच खटकते.

(४) 'बाजीराव व त्याचा रमणा' यामुळे एकंदर 'ब्राह्मणी राज्या'विषयीच लोकांची मने कलुषित झाली. म. फुले यांच्या लिखाणात ही जुगुप्सा वारंवार प्रकट झाली आहे. स्वत: बाजीराव पुढे १८५१ पर्यंत हयात होता. परंतु, पुन: पुण्याकडे येण्याची त्याला अगर त्याच्या वंशजांना हिंमत झाली नाही. न. चिं. केळकर लिहितात– "१८१८ साली, बाजीरावसाहेब पुणे सोडून गेले ते पुन्हा पुण्यास परत आले नाहीत. येवढेच नव्हे, तर पेशवे घराण्यापैकी एकही पुरुष पुण्यात येऊन कायमचा राहिला नाही..." खुद्द रावबाजी मृत्यू पावल्याची बातमी इकडे आली तेव्हा 'ज्ञानप्रकाशादी वर्तमानपत्रांत त्याच्या मृत्युलेखाची बोळवण वर्तमानसारासारख्या दहापाच ओळींत झालेली आढळते.'[२१]

(५) या जुगुप्सेचा फायदा घेऊन इंग्रजांनी महाराष्ट्रात आपले स्थान पक्के केले. १८२१ साली संस्कृत पाठशाळेचा जो जाहीरनामा निघाला, तो फक्त ब्राह्मणांपुरताच मर्यादित आहे. विद्येची कवाडे सर्वांना मुक्त करणे इंग्रजांना सहज शक्य होते, पण त्यांनी तसे केले नाही. ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यांच्यांतील तेढ वाढली तर ती इंग्रजांना हवीच होती. हा जाहीरनामा म्हणतो– "तमाम ब्राह्मण लोकांस जाहीर व्हावयाकरिता लिहिणेत येत आहे जे : कुंपणी सरकारची मर्जी आहे की, या मुलकात ब्राह्मण लोक बहुत आहेत. विद्या पढून पंडित व्हावे म्हणून ऐशास, शहर पुणे येथे, विश्रामबागेचा वाडा पाठशाळेस नेमून विद्या पढविणेस शास्त्री, पंडित वगैरेस नेमिले आहे."...इ.[२४]

(६) ऐतखाऊ, भटां-भिक्षुकांबद्दलचा राग लोकांच्या मनांत खदखदत राहिला. एक पुणेकर लिहितो– "भट-भिक्षुक, आगांतुक, आचारी-पाणके वगैरे लोकांच्या व कचेऱ्यांच्या जागा व मंडईचा रस्ता एकच असल्यामुळे बाजाराचे दिवशी तर मोठी पंचाईत पडते. रस्त्यामधून जावे तर गुराढोरांचा उपद्रव, कडेने जावे तर भटा-भिक्षुकांचा उपद्रव."[२५]

या लिखाणावर अधिक भाष्य करण्याची जरूर नसावी !

तात्पर्य, ज्या अनेकविध कारणांमुळे पेशवाईच्या उत्तर काळात एतद्देशीय समाजाचे विघटन झाले, त्यांत 'रमण्या'चा क्रमांक फारच अग्रहक्काने घालावा लागेल !

---

**संदर्भ—**


१. पहा– कीर धनंजय : फुले चरित्र (इंग्रजी), मुंबई (१९६४), पृ. ३३.
२. पारसनीस, डी. बी. : 'पूना इन बायगॉन डेज', मुंबई (१९२१), पृ. ३४.
३. शाळीग्राम, शंकर तुकाराम, : रामजोशीकृत लावण्या, चित्रशाळा प्रेस, पुणे (१९०८), पृ. १०१–१०२.
४, सरदेसाई, गो. स. : पेशव्यांच्या रोजनिशीतील उतारे, २२ वा भाग, गव्हर्मेंट सेन्ट्रल प्रेस, मुंबई (१९३२), पृ. १४६.
५. वाड, गणेश चिमणाजी : 'सिलेक्शन्स फ्रॉम द सातारा राजाज अॅण्ड पेशवा डायरीज, द पूना डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी', मुंबई (१९०८), पृ. ४८.
६. पारसनीस, डी. बी. : उद्धृत, पृ. ३४–३५.
७. कित्ता, पृ. ३४–३५.

८. सरदेसाई, गो. स. : उद्धृत, पृ. १७६.
९. कित्ता, पृ. १६५.
१०. कित्ता, पृ. १०८.
११. खरे, वा. वा. : ऐतिहासिक लेखसंग्रह, मिरज (१९२४), भाग १२ वा, पृ. ६७७२.
१२. अदवंत, म. ना. : 'पैंजण' पुणे १९५४, (आवृत्ती १ ली), पृ. १६४.
१३. कित्ता, पृ. ४०.
१४. सरदेसाई, गो. स. : उद्धृत, पृ. १३९.
१५. अशा कित्येक नोंदी दुसऱ्या बाजीरावाने स्वहस्ते केलेल्या जमाखर्चात आहेत. पहा– सरदेसाई गो. स. : उद्धृत 'पृष्ठे– १४७, १४९, १५४, १५७ इ.
१६. वाड, गणेश चिमणाजी : उद्धृत, पृ. २२७.
१७. पारसनीस, डी. बी. : उद्धृत, पृ. ३८–४१.
१८. सरदेसाई, गो. स. : पृ. १४७.
१९. कित्ता, पृ. १४६.
२०. वाड, गणेश चिमणाजी, उद्धृत, पृष्ठे ४७–४८.
२१. केळकर, न. चिं. : लोकमान्य टिळक यांचे चरित्र (पूर्वार्ध), (पुणे) १९२३, पृ. ६३.
२२. कित्ता, पृ. ६३.
२३. कित्ता, पृ. ५२.
२४. आपटे, ओतुरकर : 'साधन परिचय' अर्थात महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास (पुणे), १९४७, पृ. २३५,
२५. केळकर, न. चिं. : उद्धृत, पृ. ५७.

# विकसनशील देशात वैज्ञानिक आणि तांत्रिक कुवतीचे संवर्धन कसे करता येईल ? –काही समस्या

**प्रास्ताविक** : प्रा. अब्दुस सलाम यांनी गेल्या जानेवारीत मुंबईला भेट दिली असताना त्यांची आणि प्रा. बी. एम्. उदगावकर यांची एक विस्तृत चर्चा 'टाइम्स ऑफ इंडिया'ने घडवून आणली. विकसनशील देशांच्या वैज्ञानिक व तांत्रिक कुवतीचे संवर्धन कसे करता येईल, ह्या प्रश्नाशी संबंधित असलेल्या समस्या हा ह्या चर्चेचा विषय होता. उत्तर आणि दक्षिण* यांच्यामधील वैज्ञानिक विषमता – पूर्वीची आणि सध्याची, एकलकोंडेपणाच्या वृत्तीची समस्या, संस्था कशा उभाराव्यात हा प्रश्न, विकसनशील देशांतील मूलभूत संशोधनाचे स्थान, विकसनशील देशांत 'उत्कृष्टतेची केंद्रे' निर्माण करण्याला असलेले महत्त्व, उत्तर-दक्षिण संवादात उपस्थित होणाऱ्या समस्या, विकसनशील देशांनी विकसित देशांच्या औदार्यावर अवलंबून न राहता, स्वावलंबी वृत्तीने स्वतःच्या साधनसामग्रीचा उपयोग करण्याला आणि परस्परसहकार्याने कार्यक्रमांची आखणी करण्याला असलेले महत्त्व इ. प्रश्न ह्या चर्चेत हाताळले गेले. ह्या चर्चेचा काही भाग 'टाइम्स ऑफ इंडिया' मध्ये २५ जानेवारी १९८१ रोजी प्रसिद्ध झाला होता. संपूर्ण चर्चा 'फिजिक्स न्यूज' ह्या नियतकालिकाच्या खंड १२; अंक १, (मार्च १९८१) मध्ये प्रसिद्ध झाली आहे आणि तिचा अनुवाद – 'फिजिक्स न्यूज'ने त्याच अंकात, ह्या संवादाच्या संदर्भात लिहिलेल्या संपादकीयासह – संपादकांच्या अनुमतीने, पुढे प्रसिद्ध केला आहे. 'फिजिक्स न्यूज'च्या संपादकांच्या सौजन्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. – संपादक

---

**उद** : प्रा. सलाम, विकसनशील देशांना वैज्ञानिक आणि तांत्रिक कुवत कशी कमावता येईल ह्या प्रश्नाशी संबंधित असलेल्या अनेक समस्यांची चर्चा मला तुमच्याबरोबर करायची आहे. तुमच्या व्याख्यानांत आणि लिखाणात जो एक मुद्दा वारंवार डोकावतो, त्याच्यापासून आपल्याला सुरवात करता येईल– तुम्ही त्याला 'वैज्ञानिक विषमतेचे चक्र' असे म्हटले आहे.

**सलाम** : बरोबर ! एके काळी आपण विज्ञानात अग्रेसर होतो, पण हे अग्रस्थान आपण गमाविले. ते आपण मुख्यतः एकलकोंडेपणाने गमावले. विश्वास बसणार नाही इतक्या लवकर हिंदू एकलकोंडे झाले. चिनी लोकांनी, बाहेरच्या जगाशी संपर्क येऊ नये म्हणून आपल्या सर्व नावा नष्ट केल्या. जपानी लोकांनीही बाहेरचे कुणी आपल्या देशात येऊ नये म्हणून आत येऊ पाहणाऱ्यांना विरोध केला. अखेरीस कोमोडोर पेरीने त्यांना देश 'उघडायला' भाग पाडले. मला अलिकडेच असे आढळून आले आहे की, मुसलमानांनीही मध्ययुगात बाहेरच्या जगाशी असलेला संपर्क तोडून टाकला होता. एके काळी, तेराव्या शतकाच्या पूर्वी, ते खरोखरच शिखरावर होते. बाराव्या आणि तेराव्या शतकांत पाश्चात्त्य लोक पौर्वात्यांकडून जे काही विज्ञान प्राप्त होऊ शकेल त्याचा अधाशीपणे शोध घेत होते. त्याचे भाषांतर त्यांनी केले, ते त्यांनी आत्मसात केले, आणि त्याच्यात सुधारणा करायला त्यांनी सुरवात

* उत्तर = उद्योगप्रधान अथवा विकसित देश.
दक्षिण = विकसनशील देश.

केली. याउलट, आपण मात्र त्यांच्या विज्ञानाच्या संबंधात ही गोष्ट केली नाही.

उद : असे का घडले असावे ?

सलाम : ह्याची काही बाह्य कारणे असणारच. पण त्याबरोबरच कित्येक खोलवर जाणारी आंतरिक कारणेही असणार. इस्लामी जगाच्या बाबतीत मला असे वाटते, की इस्लामी धर्मशास्त्राला प्राधान्य देणारे आंदोलन, तसेच सुफी पंथाचे आंदोलन यांच्यामुळे लोकांचे ध्यान वैज्ञानिक साधनेपासून दुसरीकडे वळले. माझी भावना एकंदरीत अशी आहे; पण काय घडले हे अधिक चांगल्या प्रकारे समजून घेण्यासाठी खूपच अधिक संशोधन करावे लागेल. ते काही असो, हा समाज एकलकोंडेपणे बाजूला राहिल होता ही वस्तुस्थिती पूर्णपणे निर्विवाद आहे. पोर्तुगीजांनी समुद्रांवरून नौकानयन करण्याची एक नवीन पद्धत शोधून काढली होती. पूर्वीच्या पद्धतीप्रमाणे जहाजे किनाऱ्याकिनाऱ्याने चालवीत किंवा समुद्रातील प्रवाहांना अनुसरून चालवीत. पोर्तुगीजांनी सागरी प्रवाहांना कापीत कापीत भारत गाठले. पण आम्ही ही नवीन, सुधारलेली नौकानयनाची पद्धती किंवा तिच्यामागे असलेले विज्ञान हस्तगत करण्याचा प्रयत्न केला नाही. दुसरे उदाहरण घ्या: महाराजा जयसिंग हा एक असाधारण पुरुष होऊन गेला. पंधराव्या शतकात रचण्यात आलेल्या ग्रहस्थानाच्या सारणी (अॅस्ट्रॉनॉमिकल टेबल्स ) दुरूस्त करण्याचा प्रयत्न केला आणि सूर्यचंद्राच्या ग्रहणाच्या त्या वेळच्या ज्या सारणी होत्या त्यांत असलेल्या गंभीर चुका त्याने दुरुस्त केल्या यात शंका नाही. पण गॅलिलिओच्या उपपत्ती समजून घेण्याचा प्रयत्न त्याने केला नाही.

उद : होय. शिवाय आपल्या जंतरमंतरची– वेधशाळेची–आखणी करताना आणि ती बांधताना त्याने दुर्बिणीचा शोध लागला आहे ह्या गोष्टीची दखलही घेतली नाही.

सलाम : होय. दुर्बिणी आहेत ह्या गोष्टीचा त्याला पत्ताच नव्हता. परंतु ह्या बाबतीत त्याला दोष देणे कदाचित योग्य होणार नाही, कारण वेधशाळांतून दुर्बिणीचा उपयोग नंतरच्या काळात, त्याच्या मृत्यूनंतर काही वर्षांनी होऊ लागला. तथापि न्यूटनच्या उपपत्ती अस्तित्वात होत्या. पण त्याच्याविषयी त्याला आस्था नव्हती.

शिवाय आपल्या लोकांत काही अहंमन्यताही होती. आपले लोक अतोनात आत्मलक्षी आणि अहंमन्य बनले होते. ऑटोमन दरबारात जो ब्रिटिश वकील होता त्याने १८०० साली असे लिहून ठेवले होते, की "नौकानयनाची कला तसेच लोहचुंबकाचा वापर कसा करावा याची एकाही माणसाला येथे यत्किंचितही कल्पना नाही. देशाटन केल्याने मन रुंदावते आणि आपल्या ज्ञानात भर पडते. पण ह्यांच्या अहंमन्यतेमुळे आणि अधिकारपदी असलेल्या व्यक्तीशिवाय इतर कुणीही जर परकीयांशी संपर्क राखला तर त्याच्याकडे संशयाने पाहण्याच्या प्रवृत्तीमुळे, परदेशी प्रवासाला जाण्याची त्यांची इच्छाच समूळ खुडली जाते. ह्यामुळे ज्याला सामान्य वैज्ञानिक ज्ञान आहे असा माणूस आढळत नाही. तोफा ओतण्याची कला, जहाजे बांधण्याची कला ह्यांसारख्या कलांविषयी सामान्य कारागीर सोडून इतर कुणी जर काही कुतूहल दाखविले तर त्याची हे लोक जवळ जवळ वेड्यात गणना करतात. उपयुक्त किंवा मूल्यवान वस्तू इतरांकडून खरेदी करायला त्यांना आवडते, पण ह्या वस्तू स्वत: घडविण्याचे श्रम त्यांना नको असतात."

उद : दुर्दैवाने विकसनशील देशांमध्ये आजसुद्धा परदेशी बनावटीच्या वस्तू आणि तंत्रज्ञान ह्यांच्याविषयी हीच वृत्ती राहिलेली आढळते.

पण बौद्धिक साधनेच्या, विशेषतः वैज्ञानिक संशोधनाच्या गुरुत्वमध्याचे जे स्थलांतर झाले त्याकडे आपण परत वळू या. आधुनिक काळातही अशी स्थानांतरे काही प्रमाणात झाल्याचे आढळते. उदा. १९३० च्या सुमारास वैज्ञानिक संशोधनाचा गुरुत्वमध्य युरोपमध्ये, बऱ्याच प्रमाणात जर्मनीमध्ये होता. त्यानंतर तो अमेरिकेमध्ये सरकला. अलिकडे युरोपिअ-



अनुक्रमणिका






नांनी अनेक युरोपिअन यंत्रणा उभारून विज्ञानक्षेत्रात युरोपिअन अस्मितेची पुनः-स्थापना करण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न केला आहे. उदा. युरोपीय पारमाण्विक संशोधन केंद्र (सी. इ. आर. एन*), युरोपीय अवकाश यंत्रणा, युरोपीय अण्विक जीवशास्त्र संघटना. अशा संघटनांची तसेच संशोधनाला वाहिलेल्या अनेक नियतकालिकांची स्थापना त्यांनी केली आहे. ह्या पद्धतशीर प्रयत्नांच्या जोरावर गुरुत्वमध्य स्वत.कडे सरकविण्यात त्यांनी बऱ्याच प्रमाणात यशही मिळविले आहे. औद्योगिक क्षेत्रामध्येसुद्धा त्यांनी लहान लहान कंपन्या एकत्र आणून, त्यांचे मोठया कॉर्पो-रेशन्समध्ये सामिलीकरण केले आहे. कधीकधी तर अशी मोठी कॉर्पोरेशन्स भिन्न राष्ट्रांमधल्या सरहद्दी ओलांडून अनेक राष्ट्रांत पसरलेल्या, बहुराष्ट्रीय स्वरूपाच्या असतात. कित्येक औद्यो-गिक प्रकल्प अनेक राष्ट्रांनी एकत्र येऊन संयुक्त-पणे हाती घेतले आहेत. अमेरिकन कॉर्पोरेशन्स-बरोबर स्पर्धा करता यावी, अमेरिकन आव्हानाला तोंड देता यावे ह्या उद्देशाने, ह्या आणि इतर पद्धतींनी त्यांनी नवीन संघटना उभारल्या आहेत. ह्या घडामोडींपासून 'तिसऱ्या जगा'ला काही धडा घेता येईल असे तुम्हाला वाटते का ?

सलाम : होय. तिसऱ्या जगाने जर जाणीवपूर्वक आणि एकत्रित येऊन प्रयत्न केले तर, आप-ल्याला वर्चस्व नाही, तरी आपल्या स्वाभि-मानाशी सुसंगत असा बरोबरीचा दर्जा निश्चित फिरून मिळविता येईल.

मी जेव्हा एखाद्या हॉस्पिटलमध्ये जातो आणि माझा जीव वाचविण्यासाठी औषधांची मागणी करतो, तेव्हा माझ्या मनात नेहमी हा विचार येतो : हे जे एवढे अमोघ औषध आहे त्याचा आणि माझ्या वाडवडिलांचा काही तरी संबंध आहे का ? ते शोधून काढण्यात आमचे यत्किंचित् तरी योगदान आहे का ? मी त्यांची किंमत मोजू शकतो एवढ्यावरूनच ते स्वीका-रायचा हक्क मला प्राप्त होतो का ? की ह्या लोकांनी मला दयाळूपणे तो हक्क बहाल केला आहे म्हणून तो मला आहे ? माझा स्वाभि-मान, शोभनीय काय असते ह्याविषयीची माझी भावना दुखावली जाते. इतरांना अशाच यातना होत नाहीत या गोष्टीचे मला नवल वाटते. आपल्याला भीक मागण्याची सवयच जडली आहे. आपले परराष्ट्रांतील वकील त्या लोकांना म्हणतात, "आम्हाला तुम्ही तंत्रज्ञान दिले पाहिजे, कारण आम्ही एक विकसननील देश आहो आणि तुमच्याकडून तंत्रज्ञान संक्रांतीची मदत मिळविणे हा आपला विश्वमान्य असा नैतिक अधिकार आहे." आग लागो ह्या वृत्तीला ! कोठे आहे आपला स्वाभिमान ? आपण स्वतः काही निर्माण करू या की !

उद : मलाही तसे वाटते. अशा बाबतीत परोपकारी वृत्तीची फारशी अपेक्षा करण्यात अर्थ नाही आणि आपली वैज्ञानिक व तांत्रिक कुवत कमा-वण्यासाठी आपले आपणच जाणीवपूर्वक प्रयत्न केले पाहिजेत असेच मला नेहमी वाटत आले आहे. ही कुवत आपल्याला कशी कमावता येईल ह्याविषयीच्या तुमच्या काय कल्पना आहेत ?

सलाम : ही गोष्ट साधण्याचा एकच मार्ग आहे. आपण ह्यासाठी पुरेसा पैसा खर्च केला पाहिजे आणि पुरेसे श्रम घेतले पाहिजेत. मग आप-ल्याला नक्की यश येईल.

उद : गेली अनेक वर्षे, विकसनशील देश आपण आपल्या एकूण राष्ट्रीय उत्पादनाच्या (ए. रा. उ.) निदान एक टक्का इतकी रक्कम संशोधन आणि विकास (सं. वि.) यांवर खर्च केली पाहिजे असे म्हणत आहेत. पण भारतातसुद्धा संशोधन आणि विकास यांवरील खर्च एकूण राष्ट्रीय उत्पादनाच्या ०.६ टक्का इथपर्यंतच जेम तेम पोचला आहे. इतर विकसनशील देशांत तो याहून किती तरी कमी आहे. उलट विकसित देश सं. वि. वरती एकूण राष्ट्रीय उत्पादनाच्या २, ३ किंवा ४ टक्के एवढासुद्धा खर्च करतात.

* जगातील एक अग्रेसर संशोधनसंस्था.

अनुक्रमणिका

सलाम : हे तर आहेच. पण केवळ टक्केवारी हिशेब करून भागणार नाही. रक्कम किती खर्च होते हेही ध्यानात घ्यावे लागेल. भारताच्या ए. रा. उ. च्या ०.६ टक्का म्हणजे रक्कम तशी तुटपुंजीच होते. वैज्ञानिक संशोधनासाठी करावा लागणारा खर्च काही देशपरत्वे बदलत नाही, तो सर्व देशांत सारखाच असतो. संशोधन ऋीएस्तऐवजी मुंबईत केले म्हणून कमी खर्च येत नाही. कित्येक बाबतीत युरोप कमी खर्चाचे ठरेल. कारण आवश्यक ती सामग्री आणि उपकरणे जवळपास उपलब्ध असतात. आणि तज्ञही जवळपास उपलब्ध असतात. त्यामुळे त्यांची नेआण करायला कमी पैसे आणि प्रयास पडतात. विकसनशील देशात आपण पुरेसे प्रयत्नच करीत नाही असे म्हणणे भाग आहे.

दुसरी गोष्ट अशी की, विज्ञान बहुजनसमाजापर्यंत झिरपले पाहिजे. हे पुरेशा प्रमाणात साधले जात नाही याबद्दल मला अधिकाधिक काळजी वाटू लागली आहे. अत्यंत प्रगल्भ विज्ञान आणि तंत्रज्ञान आपल्यापाशी असण्याला, विज्ञान व तंत्रज्ञान यांची अगदी 'मलई' आपल्यापाशी असण्याला जेवढे महत्त्व आहे तेवढेच महत्त्व ह्या दुसऱ्या गोष्टीलाही आहे. दोन्ही गोष्टी महत्त्वाच्या आहेत — एक दुसरीचा पर्याय होऊ शकत नाही. विज्ञानाला जर तुम्हाला सामाजिक अधिष्ठान द्यायचे असेल, तर ही दुसरी गोष्टही आपल्याला साधावी लागेल.

उद : ह्यालाच 'वैज्ञानिक मनोवृत्तीची निर्मिती' असे पंडितजी म्हणत.

सलाम : ते आपल्या काळाच्या पुढे होते असे म्हटले पाहिजे.

उद : आजसुद्धा राष्ट्रातील महत्त्वाचे निर्णय घेणाऱ्या वर्गातही वैज्ञानिक मनोवृत्ती विशेष प्रकर्षाने आढळते असे दिसत नाही.

सलाम : मला तरी असे दिसते आहे की, आता तुम्हा लोकांत विज्ञानाचा अभ्यास केलेल्या मंडळींची उच्च स्थानावर नेमणूक व्हायला प्रारंभ झाला आहे.

उद : होय. शासनात सचिवांच्या पदावर हल्ली काही वैज्ञानिक आढळतात. पण त्यांना बऱ्याच अडचणींना तोंड द्यावे लागते. कारण वैज्ञानिक पद्धतीने नियोजन करावयाचे ठरवले म्हणजे काही पथ्ये पतकरावीच लागतात. त्याकरता एक शिस्त लागते. या पथ्यांचे आणि शिस्तीचे महत्त्व किती असते याची जाणीव सबंध शासनव्यवस्थेला अद्यापि झालेली नाही आणि ती तिच्या अंगवळणी पडलेली नाहीत.

बहुजनसमाजात वैज्ञानिक मनोवृत्ती निर्माण करण्याच्या दृष्टीने पाहता, विज्ञान सामान्य जनतेपर्यंत पोहोचवण्यासाठी झटणाऱ्या काही चळवळी भारतात सुरू झाल्या आहेत. केरळमध्ये 'केरळ शास्त्र साहित्य परिषद' ह्या संस्थेच्या रूपाने ह्या चळवळीने बराच जोम धरला आहे. महाराष्ट्रातही अशा चळवळीला अलिकडेच सुरवात झाली आहे. ह्या क्षेत्रात निष्ठेने काम करणाऱ्या तरुणांचा एक गट आहे, 'लोक विज्ञान संघटना' असे नाव त्यांनी धारण केले आहे.

सामान्य माणसापर्यंत विज्ञान पोचावे ह्यासाठी काय करता येईल ह्याविषयी तुम्हाला काही सूचना कराव्या असे वाटते का ?

सलाम : ह्यासाठी भिन्न भिन्न प्रकारच्या सर्व लोकांचे साहाय्य घेतले पाहिजे. भारताविषयी मी बोलत नाही आहे. पाकिस्तानमध्ये इस्लामाचे जे पंडित आहेत, त्यांनी ह्या विषयात रस घ्यावा असा प्रयत्न मी करीत आहे. धर्म ही अतिशय बलशाली, अतिशय समर्थ अशी शक्ती आहे आणि इस्लाम जर घेतला तर त्याच्यात विज्ञान हा एक ज्ञान प्राप्त करून घेण्याचा मार्ग आहे ह्या गोष्टीवर वारंवार भर देण्यात आला आहे. ही गोष्ट हिंदू धर्मशास्त्राच्या बाबतीतही खरी असावी अशी माझी समजूत आहे. धार्मिक पाठशाळांतल्या ह्या मंडळींनी जर आमच्या वतीने वैज्ञानिक आंदोलनात भाग घेतला तर ते उपयुक्त होईल. उलटपक्षी वैज्ञानिक विचारपद्धतीत रस घ्यावयाला ह्या मंडळींना प्रवृत्त करणे ही गोष्ट सोपी नाही.

उद : तुमच्या ह्या म्हणण्यात असेही अभिप्रेत नाही का, की वैज्ञानिकांनी स्वतःला आपल्या प्रयोगशाळांच्या आणि विद्यापीठाच्या भिंतीआड

अनुक्रमणिका






बंदिस्त करून घेता कामा नये, त्यांनी सामाजिक समस्यांमध्ये रस घेतला पाहिजे, विशेषत: समाजमनात विज्ञानाचा शिरकाव ज्यांच्या योगे होईल अशा समस्यांमध्ये रस घेतला पाहिजे,?

सलाम : तुम्ही थोड्या वेळापूर्वी त्याचा उल्लेख केला ना, 'विज्ञाननिष्ठ नियोजन आणि त्याचे पद्धतिशास्त्र', तो ह्या प्रश्नाचा गाभा आहे.

उद : होय, पण त्याचा संबंध काहीशा प्रगल्भ पातळीशी पोचतो. आपण ज्या प्रश्नाविषयी आता बोलत आहो तो जरा वेगळा प्रश्न आहे– त्याचा संबंध सर्वसामान्य जनतेशी आहे.

सलाम : खरे आहे. एक उदाहरण घेता येईल. आपल्या देशात आपण मानवी श्रमाचा वापर अकार्यक्षम पद्धतीने करतो. झाडूवाला घ्या. त्याच्या कामाची जी पद्धती आहे, ती अनेक पिढ्यांपासून चालत आलेली आहे, ती तो शिकला आहे आणि वापरीत आहे. आपल्या कामाच्या पद्धतीत सुधारणा करायची संधी त्याला मिळालेली नाही, वेळ मिळालेला नाही, त्याविषयी स्वत: विचार करायला त्याला फुरसद नाही. त्याच्या पातळीपर्यंत तुम्हाला पोचावे लागेल.

उद : हे खरे आहे. पण वैज्ञानिक प्रशिक्षणाचा लाभ ज्यांना मिळालेला आहे आणि त्या दृष्टिकोणातून जे बघू शकतात त्यांच्यांत व अशा लोकांत देवाण-घेवाण झाल्याशिवाय, त्यांनी अशा लोकांचे शिक्षण हाती घेतल्याशिवाय या लोकांची स्वत:च्या धंद्याकडे, त्यातील कामाकडे पाहण्याची दृष्टी बदलता येणार नाही असे नाही का ?

सलाम : हे अगदी खरे आहे. तुम्ही प्रश्नाच्या मर्मावर बोट ठेवले आहे,

उद : विज्ञान आणि तंत्रज्ञान यांना विकासप्रक्रियेला जुंपण्याच्या बाबतीत जे आंतर्राष्ट्रीय प्रयत्न होत आहेत त्यांच्याकडे आता वळू या. तुम्ही काही वर्षांपूर्वी "आदर्श आणि वास्तवता" (Ideals & Realities) हा लेख "अण्विक वैज्ञानिकांचे नियतकालिक" (Bulletin of Atomic Scientists) यात प्रसिद्ध केला होता. त्याच्यात "कमी विकसित प्रदेशाच्या अभिवृद्धीसाठी विज्ञान व तंत्रज्ञान यांचे उपयोजन" ह्या विषयावर संयुक्त राष्ट्रांच्या वतीने १९६३ साली जी एक परिषद भरविण्यात आली होती तिचा तुम्ही उल्लेख केला होता. त्यावेळी एक "जागतिक विज्ञान व तंत्रज्ञान यंत्रणा" असावी,– तांत्रिक विकास प्राधिकरण असावे– आणि त्याला आर्थिक साहाय्य देण्यासाठी एक आंतर्राष्ट्रीय तांत्रिक विकास बँक असावी अशी मागणी विकसनशील देशांनी केली होती आणि तिच्यामागे बराच नेट लावला होता. विकसित देशांनी ही मागणी फेटाळून लावली. ह्यानंतर अलिकडेच ऑगस्ट १९७९ मध्ये व्हिएन्ना येथे "विकासासाठी विज्ञान व तंत्रज्ञान" ह्या विषयाचा विचार करण्यासाठी संयुक्त राष्ट्रांनी एक परिषद आयोजित केली होती. (U. N. Conference on Science and Technology for Development : UNCSTD). मध्यंतरीच्या काळात ह्या बाबतीत काही प्रगती झाली असे तुम्हाला वाटते का ?

सलाम : अगदी प्रामाणिकपणे बोलायचे तर सबंध संयुक्त राष्ट्र संघटना ही अनेक कारणांमुळे पूर्णपणे दूषित आणि विकृत झाली आहे. "विज्ञान आणि तंत्रज्ञान यांचे विकासासाठी उपयोजन" ह्या समस्येविषयीची संयुक्त राष्ट्रसंघाची जी सल्लागार समिती होती. (U. N. Advisery Committee on Application of Science and Technology Development.) तिचा मी सभासद आणि नंतर अध्यक्ष होतो. विज्ञान आणि तंत्रज्ञान यांसाठी जागतिक पातळीवरील एका कृति–प्रकल्पाची (World Plan of Action.) योजना आम्ही तयार केली. समितीच्या तीन बैठका झाल्यानंतर मी म्हणालो, "सद्‌गृहस्थहो, आपण आता पांगू या. आपल्याला जे करता येणे शक्य होते ते आपण अगोदरच उरकले आहे. आपल्याला एक अहवाल लिहायला सांगण्यात आले होते आणि तो लिहिण्यात आला आहे. त्याच्या आधारे जी कृती व्हावयाची तिच्यावर

काही आपल्याला देखरेख करता येणार नाही.” पण संयुक्तराष्ट्राच्या ज्या समित्या असतात, त्यांचे स्वतःचे असे जीवन असते. आमच्या समितीने त्यानंतर १९७९ च्या परिषदेची तयारी करण्यापलिकडे अर्थपूर्ण असे काही केले नाही, आणि त्या परिषदेचा तर विचकाच झाला.

मला असे वाटते, की विकसनशील देशांनी श्रीमंत देशांना विसरून जावे. त्यांना आमचे काही सोयरसुतक नाही ही वस्तुस्थिती आहे. हे वातावरण कदाचित बदलेलही. पण आज तरी त्याच्या काही खाणाखुणा मला दिसत नाहीत.

उद : माझ्या भावना अगदी तुमच्यासारख्या आहेत. अलिकडेच, उत्तरेकडील* एका श्रीमंत देशातून भारतात आलेल्या एका नामांकित शिक्षण-तज्ज्ञांची भेट घेण्याचा योग मला आला होता. ह्या प्रश्नाची चर्चा करीत असताना ते मोकळे-पणे म्हणाले, की तिकडील लोकांच्या दृष्टीने "तिसऱ्या जगातले" तेलाचे साठे सोडले तर हे देश असून नसून सारखे आहेत. पण ह्यापासून एक महत्त्वाचा निष्कर्ष निघतो – तो असा, की विकसनशील देशांत आर्थिक सहकार्य अधिक प्रमाणावर झाले पाहिजे आणि तांत्रिक सह-कार्यही अधिक प्रमाणावर झाले पाहिजे. पण ह्या प्रयत्नांना अजून खरी गती मिळायची आहे.

सलाम : ह्या संकल्पनांना अजून तपशीलवार रूपही आपण दिलेले नाही. विकसनशील देशांना कोणते प्रकल्प संयुक्तपणे हाती घेता येतील ह्याची मांडणी आपण केलेलीच नाही.

उद : तुम्हाला असे वाटत नाही का, की विकसनशील देशांमध्ये आर्थिक आणि तांत्रिक सहकार्य असावे असे वक्तृत्वपूर्ण बोलणे ठीक आहे; पण त्याच्या-पलीकडे जर आपल्याला काही अर्थपूर्ण प्रगती साधायची असेल तर OECD$ सारखी, स्वतःचे सचिवालय असलेली संघटना उभारावी लागेल आणि त्या सचिवालयात विज्ञान आणि तंत्रज्ञान यांसाठी एक भक्कम असा विभाग असला पाहिजे. म्हणजे ह्या साऱ्या वक्तृत्वाचे, प्रत्यक्ष साधता येईल अशा कार्यक्रमात, रूपांतर करता येईल. आज ‘उत्तर-दक्षिण’ संवादाची कोंडी झाल्यासारखी आहे. ह्या कोंडीतून वाट काढण्यासाठी ह्या संवादाला बौद्धिक, विश्लेषक युक्तिवादाचे जे पाठबळ देणे आवश्यक आहे ते हा विभाग पुरवू शकेल.

सलाम : ही कल्पना चांगली आहे. आपण स्वतःच आता पावले टाकली पाहिजेत हे आपण ओळखले पाहिजे.

उद : दुसराही एक प्रश्न ह्या संदर्भात उद्भवतो. जगात इतरत्र ज्या प्रकारचे मूलभूत संशोधन होते तसे संशोधन करणारी, आणि त्याच गुणवत्तेचे संशोधन करणारी संस्था घडविण्यात जर आपण यशस्वी झालो तर आपले ‘मित्र’ त्यावर टीका करतात. ते म्हणतात ही तुम्ही बाहेरून येथे संक्रान्त केली आहे. “ही संस्था तुमच्या स्वतःच्या समाजासाठी काय करीत आहे?” असे ते विचारतात. म्हणजे आमचे बुद्धिमान तरुण आम्ही त्यांच्या समाजात संक्रान्त करावे हे त्यांना पसंत असते. अशा संस्था आम्ही आमच्या समाजात संक्रान्त कराव्या हे त्यांना तितकेसे पसंत नसते.

सलाम : सुदैवाने भारताची परिस्थिती वेगळी आहे. विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्याकडे अर्थपूर्ण आणि सर्वांगीण दृष्टीने पाहता यावे अशा अवस्थेपर्यंत भारत आता येऊन ठेपला आहे. इतर विकसनशील देशांत दुर्दैवाने अशी परि-स्थिती नाही.

उद : तसे पाहिले तर, विज्ञान आणि तंत्रज्ञान यांचे भारताने अधिक हेतुपूर्ण नियोजन केले असते आणि एकंदर नियोजनात त्यांचा अधिक हेतुपूर्ण वापर केला असता, तर गेल्या तीन दशकांत

* उत्तर = विकसित देश
दक्षिण = अविकसित देश

$ Organization for Economic Co-operation & Development. उद्योग-प्रधान राष्ट्रांनी (आपसांतील) आर्थिक सहकार्य व (आपला) विकास यासाठी उभारलेली संघटना.

अनुक्रमणिका

आम्ही जे साधले त्यापेक्षा आम्हाला किती तरी अधिक साधता आले असते. ते काही असो, भारताने जे साधले आहे, ते लहान देशांनाही निश्चितपणे साधता येईल. ह्यासाठी जरूर तर प्रादेशिक सहकार्याचा अवलंब करावा. हे म्हणणे तुम्हाला पटते का ?

सलाम : ह्याच्यात एक व्यावहारिक अडचण आहे. 'प्रदेश' ह्या संकल्पनेला लोकांच्या मनात अस्तित्व नसते. उदा. लॅटिन अमेरिका हा बराचसा एकजिनसी असा प्रदेश आहे. तरी पण एका देशात वसलेल्या प्रादेशिक संस्थेला इतर देश आर्थिक साहाय्य करीत नाहीत. यामुळे, 'लॅटिन अमेरिकन सेंटर फॉर फिजिक्स' ही संस्था भरारी घेऊ शकली नाही. 'शेजाऱ्याचा द्वेष करा' हा समाजशास्त्रातला पहिला नियम आहे.

उद : युरोपियन राष्ट्रे आपल्यांतील पारंपरिक स्पर्धा आणि शत्रुत्व विसरून जातील आणि अनेक सहकारी कार्यक्रमांसाठी एकत्र येतील हे दोन दशकांपूर्वी कुणाला खरे वाटले होते का ? पण आज ते तसे करीत आहेत. आशियाई, आफ्रिकन आणि लॅटिन अमेरिकन देशांनाही गरजेपोटी एकत्र येणे भाग पडेल– आणि हे घडून यायला फार विलंब लागणार नाही अशी मला आशा आहे.

पण आर्थिक साहाय्याच्या आणि तांत्रिक मदतीच्या प्रश्नाकडे मी परत वळतो. श्रीमंत उत्तरी देश तथाकथित आर्थिक साहाय्याचे ( Aid ) जे कार्यक्रम हाती घेतात, त्यातून ते जितके देतात त्यापेक्षा किती तरी अधिक त्यांनाच परत मिळते.– अशा मदतीच्या कार्यक्रमापासून खरा लाभ त्यांनाच होतो असे दाखवून देणारे ह्या कार्यक्रमांचे विश्लेषण ह्या उत्तरी देशांतच करण्यात आले आहे.

सलाम : होय. पण आपल्या देशात हा दृष्टिकोण कुणी मान्य करीत नाही. फार काय, माझा स्वतःचा मुलगा विद्यापीठात अर्थशास्त्राचा अभ्यास करतो आहे. त्याचीसुद्धा अशी 'मेंदू-धुलाई' ( ब्रेनवॉशिंग ) झाली आहे, की त्याचे मत ह्याच्या नेमके विरुद्ध बनले आहे. हा पाकिस्तानी तरुण आहे. खुद्द माझा मुलगा आहे आणि त्याला मी माझे सर्व लिखाण वाचायला दिले आहे. पण त्याचे असे ठाम मत आहे, की हे सर्व आर्थिक साहाय्य वाया गेले आहे. अर्थशास्त्रज्ञ म्हणून तो जे शिकतो आहे ते असे आहे !

उद : ह्या परिस्थितीतून बाहेर पडायची वाट काय ?

सलाम : मला वाटते, आपल्या अर्थशास्त्रज्ञांनी आपला 'गृहपाठ' अधिक व्यवस्थितपणे, अधिक खोलवर जाऊन केला पाहिजे. केन्स घ्या. त्याची लेखनाची शैली इतकी सुरेख होती, सर्व संबंधित पुराव्याची जुळणी आणि मांडणी तो अशी करीत असे, की हळूहळू सावकाश त्याचा मुद्दा लोकांच्या गळी उतरला. आपल्याला जी नवी आंतरराष्ट्रीय आर्थिक व्यवस्था अभिप्रेत आहे तिचे स्पष्टीकरण आणि समर्थन करणारे ह्या दर्जाचे बौद्धिक काम झालेले नाही.

उद : मला असे वाटते, की समीर अमीन ह्यांसारख्या लोकांनी ह्या प्रश्नाचे अतिशय उपयुक्त असे काही विश्लेषण केलेले आहे. 'थर्ड वर्ल्ड फोरम – तिसऱ्या जगाचे व्यासपीठ – म्हणून जी संघटना आहे, तिने तयार केलेले काही प्रबंधही मी पाहिले आहेत. पण ह्याविषयी पुरेसे काम झालेले नाही हे मला मान्य आहे– आणि ह्या प्रश्नाच्या महत्त्वाबाबत 'तिसऱ्या जगा'त असलेली जाणीव, विशेषतः ह्या देशातील निर्णय घेणाऱ्या समाजधुरिणांच्या ठिकाणी असलेली जाणीव, फारच कच्ची आहे.

सलाम : माझा विश्वास असा आहे – ह्याला पुष्टी देणारा पुरावा आता माझ्यापाशी नाही पण तो गोळा करता येईल अशी आशा मला आहे– की विकसनशील देशांना मदत केल्याने श्रीमंत देशांना स्वतःलाच मदत होईल, त्यांच्या सध्याच्या गंभीर आर्थिक समस्या सोडविण्यासाठी त्यांना तिची मदत होईल. श्रीमंत आणि गरीब देशांच्या हिताचा एकत्रितपणे विचार करणारे धोरण दोघांनाही फलदायी ठरते असे जर दाखवून देता आले, आम्हाला मदत केल्याने ते स्वतःलाही मदत करीत असतात हे





जर त्यांच्या निदर्शनाला आणता आले तर स्वतःच्या हिताच्या विचारानेच त्यांना ह्या प्रश्नाविषयी आस्था वाटू लागेल. हा जो माझा विश्वास आहे त्याला जर, केन्सने दिले होते तसे भक्कम बौद्धिक पाठबळ देता आले, तर थोड्या वर्षांत ही लढाई आपल्याला जिंकता येईल. मला काही वर्षांपूर्वी त्रीएस्त येथे नवीन आंतर्राष्ट्रीय आर्थिक व्यवस्थेवर एक कृतिसत्र (वर्कशॉप) घ्यायचे होते. ते ह्यासाठी घ्यायचे होते. पण दुर्दैवाने मला पुरेसा पैसा उभा करता आला नाही. आता मी जे काही म्हणणार आहे त्यातून माझा अहंमन्यपणा दिसून येतो असे कुणाला वाटणार नाही अशी मला आशा आहे. पण मला म्हणायचे आहे ते असे, की आपण जे पदार्थवैज्ञानिक आणि गणितज्ञ आहो त्यांना, त्यांच्या विशिष्ट शिक्षणामुळेच, ह्या जागतिक प्रश्नांचे, आणि ते सोडवायला काय केले पाहिजे याचे अधिक स्वच्छ आकलन होऊ शकते आणि अर्थशास्त्राच्या अभ्यासाच्या बळावर एखादा अर्थशास्त्रज्ञ करू शकेल त्यापेक्षा आवश्यक त्या धोरणाची अधिक तर्कशुद्ध मांडणी व समर्थन आपण करू शकू. केन्स हा गणितज्ञ होता हे विसरता कामा नये.

उद : ह्या उत्तर-दक्षिण संवादाच्या बाबतीतील एक गोष्ट अशी की, हा "शून्य-बेरीज खेळ" (Zero Sum game) आहे असेच उत्तर अजून मानते (म्हणजे उत्तरेने दक्षिणेला मदत केल्याने दक्षिणेला जेवढा लाभ होईल तेवढी नेमकी उत्तरेची हानी झालेली असेल, व अशा तऱ्हेने लाभ व हानी यांची बेरीज शून्य असेल असे उत्तर मानते.). म्हणून फारसे आर्थिक किंवा तांत्रिक 'साहाय्य' करायला उत्तर उत्सुक नसते. जेवढे दिल्याने आपले काही कमी झाले हे जाणवणार नाही, तेवढेच द्यायला ती तयार असते. उलट, दक्षिण वक्तृत्वपूर्ण भाषणे करण्याच्या अवस्थेच्या नुकती बाहेर पडत आहे. दक्षिणेचा विकास होणे हे उत्तरेच्या स्वतःच्या हिताचे आहे ही गोष्ट स्पष्ट करण्याचा प्रयत्न विली ब्रांट अहवालाने केला आहे ही गोष्ट खरी आहे. आणि दोघांनाही लाभदायक ठरतील अशा काही उपाययोजनाही त्याने सुचविल्या आहेत. पण मला असे दिसते, की उत्तरेत ब्रांट अहवालाकडे दुर्लक्ष तरी करण्यात आले आहे किंवा त्याच्यावर कडक टीका तरी झाली आहे.

दक्षिणेने 'गृहपाठ' नीट केला पाहिजे असे तुम्ही जे म्हणाला त्या प्रश्नाकडे मला वळायचे आहे. UNCTAD† सारख्या संयुक्त राष्ट्रांच्या यंत्रणांनी ह्या क्षेत्रात अत्यंत उपयुक्त काम केले आहे हे खरे असले तरी संयुक्त राष्ट्रांच्या वतीने होणाऱ्या कामाला विकसनशील राष्ट्रांच्या दृष्टीने काही मर्यादा राहणार हे उघड आहे. तेव्हा निरनिराळ्या प्रश्नांवर जरूर ती वैचारिक पूर्वतयारी करून आपली बैठक घट्ट करण्यासाठी ७७ राष्ट्रांच्या गटाला* स्वतःचा विचारागार (Think-tank असणे) आवश्यक आहे. म्हणून "OCED" ही संघटना आणि तिचे जे वेगवेगळे अभ्यासगट आहेत त्या धर्तीवर ७७ राष्ट्रांच्या गटाने पण स्वतःची संघटना उभारली पाहिजे अशी भूमिका वर मांडताना ही गोष्ट माझ्या मनात होती. आज ह्यापैकी काहीच आढळत नाही. ह्या विचारागाराने उदा. विकासाच्या वेगवेगळ्या टप्प्यांवर असलेल्या विकसनशील देशांची वैज्ञानिक व तांत्रिक कुवत कशी वाढविता येईल याची आखणी करावी, हे करताना अर्थात ह्या देशांच्या नैसर्गिक साधनसंपत्तीचा आणि त्यांच्या लोकसंख्येचा संदर्भ ध्यानात

---

† *UNCTAD :* United Nations Conference on Trade and Development Technology Transfer विषयीच्या विविध समस्यांचा सर्वांगीण अभ्यास करणारी व तद्विषयक जागतिक परिषदा भरवणारी संघटना.

* *Group of 77* ' (*G 77*) : विकसनशील राष्ट्रांचा गट, आता त्यात सुमारे १०० राष्ट्रे आहेत. हा गट उत्तर-दक्षिण वाटाघाटींत समान भूमिका (common stand) घेतो.



अनुक्रमणिका

घ्यावा लागेल. युरोपातील लहान देशांनी स्वतःचा जेवढा विकास साधला आहे तेवढा ४० ते ५० लाखांपेक्षा अधिक लोकसंख्येच्या इतर कोणत्याही देशाला का साधता येऊ नये हे मला कळू शकत नाही. व्हिएन्ना प्रोग्राम ऑफ ॲक्शन– व्हिएन्ना कृतिलक्षी कार्यक्रम– हा वैज्ञानिक व तांत्रिक कुवतीचे संवर्धन कसे करता येईल याचा सर्वसाधारण आराखडा देतो. त्यातील तत्त्वांना व्यावहारिक असे रूप दिले गेले पाहिजे. ७७ राष्ट्रांच्या गटाने हे पाऊल उचलण्याची वेळ आली आहे असे तुम्हाला वाटत नाही का ?

सलाम : मी तुमच्याशी पूर्णपणे सहमत आहे. मला तर असे वाटते, की तुमची संस्था (टाटा मूलगामी संशोधन संस्था ) आणि त्रीएस्त येथील आमचे केंद्र अशा प्रकारचा प्रकल्प हाती घेण्याच्या कामात सहकार्य करू शकतील. 'इंटरनॅशनल फेडरेशन ऑफ् इन्स्टिटयूटस् फॉर ॲडव्हान्स्ड् स्टडीज्' (आय्. एफ्. आय्. ए. एस्. 'प्रगत अध्ययन संस्थांचे आंतर्राष्ट्रीय महामंडळ') ह्या संघटनेला हे करता आले असते. मी तिच्या संस्थापकांपैकी एक आहे खरा, पण आज मला असे दिसते आहे, की ती वेगळयाच कामात गुंतली आहे. संयुक्त राष्ट्रसंघ विद्यापीठाचेही ( यू. एन्. युनिव्हर्सिटीचे) काहीसे असेच झाले आहे. त्याच्याही संस्थापन समितीवर मी काम केले होते.

उद : ह्या बऱ्याच आंतर्राष्ट्रीय प्रयत्नांच्या बाबतीत मला जे आढळून आले आहे ते असे आहे, की जरी त्यांची सुरवात एका वेगळया दिशेने, आणि ध्येयवादी वृत्तीने, विकसनशील देशांना साहाय्य करण्याच्या आशेने, होत असली तरी परिणामी बहुतेकदा विकसित देशांचा दृष्टिकोणच त्यातून प्रक्षेपित होतो.

सलाम : असे घडते खरे ! शिवाय अशा प्रयत्नांत काही विकसनशील देशांना 'गिनी पिग्ज' † म्हणून वापरण्यात येते.

उद : हे सर्रास घडत असते असे मला वाटते. उदा. 'आय्. एफ्. आय्. ए. एस्.'ने पृथ्वीवरील आजची परिस्थिती, हा जो अहवाल (धि स्टेट ऑफ् धि प्लॅनेट रिपोर्ट ) बनविला होता तो मला अतिशय असमाधानकारक वाटला. त्याच्या सुरुवातीच्या मसुद्यावर भाष्य करता येणे शक्य होते आणि मी तसे केलेही. पण अखेरीस त्या अहवालाला जे स्वरूप लाभले आहे त्याच्यात आजच्या जागतिक प्रश्नाविषयीचा 'उत्तरे'चा जो दृष्टिकोण आहे तोच प्रतिबिंबित झाला आहे. 'आंतर्राष्ट्रीय विज्ञान प्रतिष्ठान' ( इंटरनॅशनल फाऊंडेशन फॉर सायन्स, आय्. एफ्. एस्. ) ह्या संघटनेच्या बाबतीतही मला असेच आढळून आले आहे. तिची स्थापना करण्यासाठी ८–१० वर्षांपूर्वी स्टॉकहोम येथे भरविण्यात आलेल्या बैठकीला तुमच्याबरोबर मीही हजर होतो. मी तेव्हा असा पक्ष मांडला होता, की या प्रतिष्ठानाने पाच-दहा हजार डॉलर्स एवढया रकमेची अनुदाने अधूनमधून काही वैज्ञानिकांना देण्यावरच समाधान मानले तर त्यामुळे विकसनशील देशांतील वैज्ञानिकांचा प्रश्न सुटणार नाही– ह्या प्रकारच्या साहाय्यामुळे अर्थपूर्ण आणि जोमदार अशा वैज्ञानिक कार्यक्रमांची जोपासना व्हायला मदत होणार नाही. अशा तऱ्हेच्या मदतीच्या कार्यक्रमामुळे विकसनशील देशांतील वैज्ञानिकांचा परावलंबीपणा मात्र वाढेल. या लोकांची आय्. एफ्. एस्. साठी बराच मोठा निधी गोळा करण्याची मनीषा होती. तेव्हा मी अशी सूचना केली, की त्याचा निदान अर्धा वाटा विकसनशील देशांत 'उत्कृष्टतेची केंद्रे' (सेंटर्स ऑफ एक्सलन्स) निर्माण करण्यासाठी राखून ठेवावा. पण खेदाची गोष्ट म्हणजे ह्या कल्पनेत कुणी अजिबात रसच घेतला नाही.

सलाम : त्यांना फक्त काही दशलक्ष डॉलर्स जमविता आले आणि 'उत्कृष्टतेची केंद्रे' निर्माण करण्यासाठी ते पुरेसे नव्हते.

उद : तसे असेलही. पण स्टॉकहोमच्या आपल्या बैठकीत ज्या चर्चा झाल्या त्या आदर्शवादी

† 'गिनी पिग्ज' : प्रयोगशाळेत प्रयोगासाठी वापरले जाणारे एक प्रकारचे गोंडस दिसणारे उंदीर.

पातळीवरच्या होत्या. बऱ्याच मोठ्या रकमांचा उल्लेख आपल्या बोलण्यात होत होता. आय्. एफ्. एस्. च्या कार्याची उद्दिष्टे काय असावीत हे स्पष्ट करण्याचा प्रयत्न होत होता आणि त्या उद्दिष्टांसाठी निधी केवढा व कसा उभारावा लागेल ह्याचा विचार होत होता. पण तेव्हाही आपल्या 'उत्तरे' कडील 'मित्रां' नी 'उत्कृष्टतेची केंद्रे' निर्माण करण्याविषयी काहीही आस्था दाखविली नाही.

सलाम : मला असे वाटते, की ह्या दिशेने विचार करण्याची कुवत अजून ज्यांच्या ठिकाणी आहे अशा ज्या काही थोड्या संघटना आहेत त्यांच्यात आय्. एफ्. एस्. ही एक आहे.

उद : तुम्हाला असे वाटते का ? त्यावेळी तरी मला काही प्रतिसाद मिळाला नाही. आता त्यांचा दृष्टिकोण बदलला असेल तर मला बरेच वाटेल.

सलाम : शेतीविषयक संशोधनात ते जगभर चांगले काम करीत आहेत. आय्. एफ्. एस्. ची आणखी एक शाखा कॅनडात असावी अशी एक सूचना पुढे आली आहे. खरा प्रश्न पैशाचा आहे. आय्. एफ्. एस्. कडे दशलक्ष डॉलर्सपेक्षा अधिक निधी नाही. आणखी दशलक्ष डॉलर्स गोळा करायला तीन वर्षे लागतील. पैसे उभारणे अतिशय कठीण बनले आहे.

उद : काय होते, की 'उत्कृष्टतेची केंद्रे' निर्माण करायला ज्या प्रमाणावर पैसे लागतील तेवढे उभे करण्यात अडचणी येत असल्यामुळे अखेरीस वर्षाला पाच-दहा हजार डॉलर्स एवढीच अनुदाने इकडेतिकडे विखुरण्यात अशा प्रयत्नांची समाप्ती होते. ह्या अशा रकमा कशीबशी गुजराण करायला पुरतात. अशा तऱ्हेची मदत ही केवळ मलमपट्टी करण्यासारखी आहे. आपल्या समस्येचा जो गाभा आहे त्याला हे कार्यक्रम हात घालू शकत नाहीत.

सलाम : खरे आहे. एवढ्याशा साहाय्यावर वैज्ञानिक कसाबसा तरू शकतो एवढेच काय ते.

उद : जोमदार स्थानिक संशोधन केंद्रे निर्माण करण्यासाठी, किंवा 'उत्कृष्टतेची केंद्रे' निर्माण करण्यातून जो आत्मविश्वास जागृत होतो — उदा. टी. आय्. एफ्. आर्. मधून ज्या प्रकारचा आत्मविश्वास निर्माण झाला आहे — त्याचा परिपोष करण्यासाठी, त्याची मदत होत नाही. माझे असे ठाम मत आहे, की आपल्या विकसनशील देशांमध्ये अशी केंद्रे फार मोठ्या प्रमाणावर स्थापण्यात आली पाहिजेत आणि हे साधण्यासाठी आपल्याला बाहेरून फारशी मदत लाभेल अशी अपेक्षा बाळगून चालणार नाही.

सलाम : मला असे वाटते, की अशा केंद्रांसाठी विकसनशील देशांतील आपण जे आहोत त्यांनीच कंबरा कसल्या पाहिजेत आणि आवश्यक ती साधनसामग्री उभी केली पाहिजे. अलिकडे जेव्हा मी कित्येक लॅटिन अमेरिकन देशांना भेट दिली — ब्राझील, मेक्सिको, पेरू, व्हेनिझुएला ...... तेव्हा तेथील लोकांना प्रादेशिक संस्थांऐवजी आंतर-राष्ट्रीय संस्था काढाव्या असे सुचविले. आता ब्राझीलचा 'आंतरराष्ट्रीय पर्यायी ऊर्जा केंद्र' स्थापन करण्याचा मनोदय आहे. मेक्सिको एक केंद्र उभारीत आहे. पेरूमध्ये 'खाण–तंत्रशास्त्राचे आंतरराष्ट्रीय केंद्र' त्यांनी सुरू करावे अशी सूचना मी केली आहे, आणि त्यांच्या नव्या सरकारने ती मान्य केली आहे. कोलंबियामध्ये सूर्यप्रकाशापासून विद्युत-निर्मिती करण्यासंबंधी संशोधन करणारे केंद्र होईल. व्हेनिझुएलामध्ये प्रतिष्ठान स्थापन केले जात आहे आणि त्याच्यातून बहुविद्याशाखीय (मल्टी-डिसिप्लिनरी) केंद्र चालविण्यासाठी भरघोस आर्थिक साहाय्य मिळणार आहे. 'ओपेक'* देशांनीही अशी केंद्रे स्थापन करण्यात रस घ्यावा ह्यासाठी माझी खटपट चालू आहे. श्रीलंकेच्या अध्यक्षांनी मूलभूत संशोधनासाठी एक केंद्र स्थापन करण्यात येईल अशी घोषणा केली आहे. आशिया आणि

* OPEC = Organization of Petrol Exporting Countries,
खनिज तेल निर्यात करणाऱ्या राष्ट्रांची संघटना.

अफ्रिका यांमधील ज्या इतर देशांना मी भेट देणार आहे त्यांच्याकडूनही अशी राष्ट्रीय किंवा आंतर्राष्ट्रीय केंद्रे स्थापन करण्याविषयी सूचना येतील अशी माझी खात्री आहे.

उद : ह्याच्यात काय गर्भित आहे ? तर 'विज्ञान व तंत्रज्ञान' यामधील विविध शाखांतील 'उत्कृष्टतेची केंद्रे' जगाच्या विकसनशील भागातच ठिकठिकाणी निर्माण करण्याची, आणि त्यांचा खर्च पूर्णपणे नसला तरी बहुतांशी विकसनशील जगाच्या उत्पन्नातूनच भागेल अशी व्यवस्था करण्याची आपल्याला गरज आहे.

सलाम : त्या, त्या देशाच्या उत्पन्नातून ! माझा दृष्टिकोण असा आहे, की अशा केंद्राचे स्वरूप आंतर्राष्ट्रीय असावे, प्रादेशिक नसावे; त्यातील संशोधक व अभ्यासगत संशोधक आतर्राष्ट्रीय असावेत, पण त्यांचा खर्च प्रामुख्याने त्या त्या देशाकडूनच व्हावा. ज्या प्रकारच्या आत्मविश्वासाविषयी तुम्ही बोलत होता तो निर्माण करण्याचा हा एकमेव मार्ग आहे.

उद : आणि अशा प्रकारची केंद्रे स्थापन झाल्यावर त्यांनी परस्परांशी संबंध जोडून आपले एक जाळे बनविले पाहिजे.

सलाम : बिलकूल ! संयुक्त राष्ट्रसंघाचे विद्यापीठ ह्या प्रकारच्या उद्दिष्टांसाठी निर्माण करण्यात आले होते. पण असा उपक्रम त्याने हाती घेतला नाही हे अतिशय शोचनीय आहे.

उद : आय्. एफ्. आय्. ए. एस्. किंवा संयुक्त राष्ट्रसंघाचे विद्यापीठ यांसारख्या प्रकल्पांना जेव्हा काही मूर्त रूप येऊ लागले तेव्हा आजची जी आंतर–राष्ट्रीय संरचना आहे ती त्यांचा स्वतःच्या उद्दिष्टांसाठी, स्वतःच्या पद्धतीने वापर करू लागते आणि त्यांचे स्वरूप विकृत होते. अशी विकृती त्याच्यात निर्माण होऊ नये ह्यासाठी आपण पुरेशी खबरदारी घेत नाही असे वाटते, की आपण ह्या बाबतीत दुबळेच ठरतो ?

सलाम : काही प्रमाणात आपण दुबळे आहोतच; पण दुसरी गोष्ट अशी आहे, की आपण आपल्या व्यवधानात गुंतलेले असतो. एखाद्या कल्पनेला चालना दिल्यावर तिचा पाठपुरावा करायला आपल्याला अनेकदा पुरेसा वेळ आणि शक्ती नसते. मला वाटते आपल्याला एवढेच करता येईल, की आपल्यासारखीच ज्यांची उद्दिष्टे आहेत त्यांच्या हातांत आपली कल्पना सोपवून द्यावी. असे झाले तरच संघटना तिच्या मूळ, अभिप्रेत स्वरूपात टिकून राहील, नाही तर नाही.

उद : खरे आहे. आपल्या कल्पनांचा पाठपुरावा करायला बांधलेल्या अशा लोकांची आपल्याला गरज आहे.

सलाम : तुम्ही मघाशी नवीन आंतर्राष्ट्रीय आर्थिक व्यवस्थेविषयी जो मुद्दा मांडला होता त्याच्याकडे परत वळू या. ह्या विषयाला वाहिलेली 'विचारागारे' विकसनशील देशांत निर्माण होण्याची आवश्यकता आहे असे तुम्ही म्हणाला होता. ह्या दिशेने भारतात काम करणारी एखादी संस्था तुम्हाला माहीत आहे का ? अशा संस्थेमध्ये अर्थशास्त्रज्ञ आणि भौतिक आणि जैव वैज्ञानिक एकत्र आणावे लागतील.

उद : अर्थशास्त्राच्या अनेक संस्था अर्थात येथे आहेत. पण ह्या जागतिक समस्यांचा सखोलपणे आणि आपल्याला अभिप्रेत असलेल्या व्यापक सर्वांगीण दृष्टीने अभ्यास करणारी संस्था आहे असे मला वाटत नाही.

सलाम : ही एक दुःखाची गोष्ट आहे. पण आपल्याला जे म्हणायचे असते ते लोकांच्या गळी उतरवायला, नवीन प्रकारच्या संस्था उभारण्यासाठी लोकांचे मन वळवायला, खूपच वेळ लागतो. आज अस्तित्वात असलेली एखादी संघटना जरी ह्या दिशेने बळकट करता येण्यासारखी असली, तरी ती प्रक्रिया कमी खर्चाने आणि जलद गतीने पार पाडता येईल.

उद : मला जी समस्या दिसते आहे ती अशी आहे : आपल्यासारख्या देशांत विज्ञानासंबंधी काही आकांक्षा निर्माण झाल्या आहेत, आणि विज्ञान व तंत्रज्ञानाकडून आपल्या काही अपेक्षा बनल्या आहेत. तरीसुद्धा ह्या गोष्टीविषयीच्या एका सर्वस्पर्शी आणि दूरगामी दृष्टिकोणाचा अभाव आढळतो. विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्याविषयीची कुवत वाढवायची झाली आणि ह्या क्षेत्रात स्वावलंबी व्हायचे आपण ठरविले तर त्यासाठी

अनुक्रमणिका

आपली अंतर्गत आणि परदेशीय धोरणे कशा तऱ्हेची असणे आवश्यक आहे आणि त्यांचा भाग म्हणून, जे अतिशय कठीण असे कोणते राजकीय निर्णय आपल्याला घ्यावे लागतील त्यांचे पुरेसे विश्लेषण कुणीही केलेले नाही. ह्या स्वरूपाच्या विचाराची केवळ सुरवात काय ती आमच्या देशात होत आहे असे मला वाटते.

सलाम : हिंदुस्थानातील तुम्ही लोक सुदैवी आहात असे मला वाटते.

उद : इतर देशांपेक्षा आम्ही कदाचित अधिक सुदैवी असू. पण आमच्या देशातही जे निर्णय घेतात त्या श्रेष्ठींना दूरगामी दृष्टिकोणाच्या संदर्भात आपण विचार करण्याची आवश्यकता आहे, आपल्या तातडीच्या प्रश्नांच्या दडपणाखाली केवळ तात्कालिक उपाययोजना करीत राहता कामा नये, हे पटवून देणे फार कष्टाचे असते. नियोजन प्रक्रियेला– विशेषतः विज्ञान– तंत्रज्ञानाच्या क्षेत्रातील नियोजनाला – आवश्यक तेवढी मजबुती अजून आलेली नाही.

सलाम : विकसनशील देशांत विज्ञान–तंत्रज्ञानावर अपुरा खर्च होतो एवढीच त्यांच्यापुढील समस्या नाही. ह्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे राष्ट्रीय विकासाच्या प्रत्येक क्षेत्रात विज्ञानाचा आणि वैज्ञानिकांचा उपयोग करून घेण्याची इच्छा असली पाहिज.

उद : विकसनशील देशात मूलभूत संशोधनाला जे महत्त्व दिले पाहिजे त्याच्याकडे मला परत वळायचे आहे. आमचे उत्तरेकडचे दोस्त आणि संयुक्त राष्ट्रांच्या संघटनांचे 'तज्ज्ञ' सुद्धा विकसनशील देशांना अनेकदा असा सल्ला देताना आढळतात, की मूलभूत संशोधन हे काही तुमच्या कामाचे नाही, तुमच्या लोकांच्या प्राथमिक गरजांचे समाधान करण्यात तुम्हाला इतक्या प्रचंड अडचणी आहेत, की तुम्ही केवळ त्या तातडतोब सोडविण्यावरच आपले सर्व लक्ष केंद्रित केले पाहिजे. मूलभूत संशोधन करणाऱ्या संस्थांपासून होणारे लाभ पदरात पडायला खूपच वेळ लागतो. तेव्हा अशा संस्था उभारायच्या खटाटोपात तुम्ही न पडणे बरे. ह्या स्वरूपाचा दृष्टिकोण आंतरराष्ट्रीय व्यासपीठावरून– पग्वॉश[१], युनेस्को[२]; यु. एन्. डी. पी.[३], यु. एन्. सी. एस्. टी. डी.[४] व इतर– परतपरत प्रक्षेपित करण्यात येत असल्याचे मी पाहिले आहे आणि त्याचा जोराने प्रतिवाद करणे अगत्याचे झाले आहे.

सलाम : अगदी खरे ! आणि त्यामुळे आमच्या, लोकांचीच 'मेंदूधुलाई' होते. ह्या संदर्भात प्रोफेसर ब्लॅकेट यानी 'तंत्रज्ञानाचे सुपरमार्केट' ह्या संकल्पनेचा जो पुरस्कार केला होता त्याची मला आठवण होते. एक गोष्ट आपण विसरता कामा नये ती ही, की आजच्या परिस्थितीत जर आपल्या देशांतून तंत्रज्ञानाची भरभराट टिकाऊपणे घडवून आणायची असेल तर त्याचवेळी विज्ञानाची भरभराट घडवून आणल्याशिवाय गत्यंतर नाही. एक क्षेत्र आहे तसेच ठेवून दुसऱ्या क्षेत्रात विकास साधता येईल ही कल्पनाच अर्थशून्य आहे. आपल्यापुढील समस्येचा हा गाभा आहे. पण

---

१. *PUGWASH* : जागतिक प्रश्नांवर–विशेषतः शस्त्रास्त्रांच्या चढाओढीशी संबंधित समस्यांवर, आणि अलिकडे उत्तर-दक्षिण वादातील विज्ञान-तंत्रविद्या संबंधित समस्यांवर– शास्त्रज्ञांचे विचार संघटित करणारी व त्यासाठी अनेक परिसंवाद व परिषदा भरवणारी आंतर्राष्ट्रीय संघटना.

२. *UNESCO* : United Nations Educational Scientific and Cultured Organization. संयुक्त राष्ट्रांची शिक्षण विज्ञान व संस्कृतिविषयक संघटना.

३. *UNDP* : United Nations Development Programme. संयुक्त राष्ट्रांची विकासकार्यास मदत देणारी प्रमुख संघटना.

४. *UNCSTD* : United Nations Conference on Science & Technology for Development. १९७९ मध्ये संयुक्त राष्ट्राच्या विद्यमाने विकासासाठी विज्ञान व तंत्रविद्या या विषयावर झालेली आंतर-राष्ट्रीय परिषद.

अनुक्रमणिका

ही गोष्ट त्यांच्या डोक्यात शिरतच नाही असे दिसते. आय्. ए. इ. ए.* मध्ये १९६२ साली त्रीएस्त केंद्र निर्माण करावे अशी सूचना जेव्हा मी केली, तेव्हा मला उद्देशून जे महशूर विधान करण्यात आले होते ते तुम्हाला माहीत असेलच. त्यावेळी एक प्रतिनिधी अगदी स्पष्टपणे म्हणाला होता, "सद्गृहस्थहो! प्रा. सलाम हे औपपत्तिक भौतिकीच्या केंद्राची मागणी करीत आहेत. औपपत्तिक भौतिकी ही विज्ञानाची 'रोल्स रॉइस' आहे. पण ह्या लोकांना आज खरी गरज असेल तर ती खटाऱ्यांची आहे. त्यापेक्षा अधिक कशाची त्यांना गरज नाही." तेव्हा त्यांची कल्पना अशी आहे, की खटारेच आमच्या उपयोगाचे आहेत व त्याच्यावरच आमचे काम भागेल. पण दुर्दैवाने खटारे तुम्हाला एका टप्प्यापर्यंतच नेऊन पोचवतील, त्याच्यापुढे ते कामाला येत नाहीत. आणि खटारा वापरावयाचा झाला तरी एका प्रकारचा खटारा आणि दुसऱ्या प्रकारचा खटारा यांच्यांत भेद करणे जरूर असते आणि 'रोल्स रॉइस'ची माहिती असेल तरच असा भेद डोळसपणे करता येतो. मूलभूत संशोधनामुळेच असा डोळसपणे भेद करणारी मंडळी देशाला उपलब्ध होऊ शकते. अशा डोळसपणे भेद करणाऱ्या वर्गाला उत्तेजन देणे आवश्यक असते.

उद : शिवाय मूलभूत संशोधनामुळे देशात वैज्ञानिक संस्कृती निर्माण होते. नाही तर आपली संस्कृती केवळ उसनी, नकली राहते–तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात आणि इतर क्षेत्रांतही.

सलाम : ही गोष्ट अगदी खरी आहे. उदा. जपानमध्ये अतिशय जोमदार असा वैज्ञानिक वर्ग आहे– पाश्चात्त्य देशांत आढळतो त्यापेक्षाही तो अधिक जोमदार आहे. जपानशी तुलना करता कित्येक युरोपियन देश निरक्षर ठरतील.

उद : १८६७-६८ मध्ये मेजी राजवटीत जपानच्या आधुनिकीकरणाला सुरुवात झाली तेव्हापासून जपानमध्ये विज्ञान व तंत्रज्ञान यांच्यासाठी एक व्यापक बैठक निर्माण करण्यावर भर देण्यात आला होता.

सलाम : 'यु. एस्. नॅशनल अॅकडेमी ऑफ् सायन्स'च्या एका अलिकडच्या अहवालात आजपासून दहा वर्षांनी कदाचित अमेरिका मागे टाकली जाईल अशी भीती व खेद व्यक्त करण्यात आला आहे. अलिकडे कण-भौतिकीच्या (पार्टिकल फिझिक्स) क्षेत्रात आपला क्रमांक निर्विवादपणे पहिला राहिला नाही ह्याची खंत ते बाळगीत आहेत असे आढळते.

उद : यूरोपने एकवटून जे प्रयत्न चालविले आहेत, ज्यांचा उल्लेख मी मघा केला, त्याचा हा परिणाम असावा.

सलाम : होय. पण अमेरिकन लोकांना दुसऱ्या क्रमांकावर खूष का राहता येत नाही असा प्रश्न आपल्याला विचारता येईल. त्यांचा क्रमांक दर वेळी पहिलाच का राहिला पाहिजे ?

उद : आणि काही क्षेत्रांत तरी विकसनशील देशांनी स्वत:साठी पहिल्या किंवा दुसऱ्या क्रमांकाची आकांक्षा का बाळगू नये ?

मूलभूत विज्ञानाविषयीच्या ह्या प्रश्नाचा मला आणखी थोडा पाठपुरावा करायचा आहे. तुम्हाला माहीत आहेच, की विकसनशील देशांतील अनेक वैज्ञानिकांनी औपपत्तिक भौतिकीत चांगले काम केले आहे. पण प्रायोगिक भौतिकीत काम करणारे फारच थोडे आहेत. ह्यामुळे विज्ञानाच्या विकासात एकांगीपणा आणि असमतोल निर्माण होतो. किंबहुना आपल्याला असेही म्हणता येईल, की उच्च दर्जाच्या प्रायोगिक भौतिकीशी निकटचे साहचर्य आल्याशिवाय उच्च दर्जाची औपपत्तिक भौतिकीही विकसित होण्यात अडचणी येतात. तेव्हा विकसनशील देशांना मोठ्या प्रायोगिक सुविधा, त्या खूप खर्चाच्या असल्या तरी, निर्माण कराव्या लागतील– उदा. आण्विक भौतिकी-

* *IAEA* : International Atomic Energy Agency– आंतर-राष्ट्रीय अणु-ऊर्जा संघटना.

साठी आवश्यक असलेले प्रवेगक ( अॅक्सलरेटर्स ). उच्च-ऊर्जा भौतिकीच्या बाबतीत, स्थानिक प्रयोगशाळांमध्ये प्राथमिक काम करून त्याच्या जोरावर युरोपमधील सी. इ. आर्. एन्.$ किंवा अमेरिकेतील फर्मी प्रयोगशाळा अशा ठिकाणचे प्रवेगक वापरावयाचे म्हटले तर, त्यासाठी आवश्यक ती आधारभूमी देऊ शकणाऱ्या प्रयोगशाळाही आपल्याकडे नाहीत, मग स्वतःचा एखादा मोठा प्रवेगक असण्याची गोष्टच सोडा. ह्या दिशेने विचार करण्याची आपल्या लोकांची छातीसुद्धा होत नाही. तेव्हा एक दुहेरी कार्यक्रम हातात घेण्याची वेळ आली आहे, असे तुम्हाला वाटत नाही का ? एक तर, आपल्याला प्रयोजकांचे जोमदार असे स्थानिक गट संघटित करावेत आणि युरोप, अमेरिका किंवा रशिया येथे असलेल्या प्रवेगकांद्वारा पहिल्या दर्जाचे प्रयोग करण्यासाठी आवश्यक असलेल्या प्रयोगसामग्रीची बांधणी करण्यासाठी पुरेसे आर्थिक साहाय्य त्यांना उपलब्ध करून द्यावे. पुढचे पाऊल असे, की ह्या प्रयत्नातून अशी एक बैठक तयार करावी, की विकसनशील देशांच्या परस्परसहकार्याच्या जोरावर जागतिक दर्जाचा प्रवेगक बनविण्यासाठी तरी तिचा उपयोग करता येईल किंवा 'अति महान प्रवेगका' च्या बांधणीसाठी जागतिक सहकार्यावर आधारलेल्या ज्या प्रकल्पाविषयी हल्ली बरीच चर्चा चालू आहे त्यात सार्थपणे सहभागी होता येईल.

सलाम : मी तुमच्याशी पूर्णपणे सहमत आहे. सी. इ. आर्. एन्. च्या 'विज्ञान धोरण समिती' वर मला अलिकडे निवडण्यात आले आहे. हा प्रश्न येथे उपस्थित करायला मला आनंद वाटेल– तशी माझी इच्छा आहे. दुर्दैवाने त्यांचे नेहमीचे म्हणणे एवढेच असते, की "तुम्ही पैसे भरा आणि प्रवेश घ्या." आणि पैसे भरायची आपली ताकद नसते. मला सूचना करावीशी वाटते ती अशी, की ह्या प्रायोगिक सुविधांचा लाभ घेण्यासाठी विकसनशील देशांतील वैज्ञानिकांकडून केवळ नाममात्र आकार घेण्यात यावा. सी. इ. आर्. एन्. ची ह्याला मान्यता मिळविणे सोपे जाणार नाही– तो निर्णय राजकीय स्वरूपाचा आहे.

उद : सी. इ. आर्. एन्. मधील एका मान्यवर वैज्ञानिक-मित्राला मी अनेक वर्षांपूर्वी जे एक पत्र लिहिले होते त्याची मला आता आठवण होते. ह्या पत्रात मी सुचविले होते ते असे : अनेक हुशार तरुण भारतीयांना उच्च ऊर्जा-भौतिकीत खूपच रस आहे; पण प्रवेगकाभोवती प्रयोग करणाऱ्या शास्त्रज्ञांशी देवाणघेवाण करण्याची संधी त्यांना भारतात मिळत नाही. ह्या परिस्थितीत सी. इ. आर्. एन्. ने जर औपपत्तिक भौतिकीत पी. एच्‌डी. नंतरचे संशोधन करणाऱ्या अधिक भारतीय वैज्ञानिकांना, केवळ त्यांच्या गुणवत्तेनुसार, सी. इ. आर्. एन्. मध्ये काम करण्यासाठी आर्थिक साहाय्य दिले, भारत सी. इ. आर्. एन्. चा सभासद नसलेला देश आहे म्हणून तेथे काम करू इच्छिणाऱ्या भारतीयांच्या संख्येवर जे बंधन येते ते डावलले, तर ते फार उपयुक्त ठरेल. पण ही गोष्ट मान्य होऊ शकली नाही. तुम्ही म्हणाला त्याप्रमाणे हा राजकीय निर्णय असतो. माझ्याकडे ज्या अडचणींचा निर्देश करण्यात आला त्यांतील एक अशी होती, की गरीब देशांना ज्या गोष्टींची आज निकडीची जरुरी आहे, त्यांच्यांत 'उच्च ऊर्जा भौतिकी'-चाही अंतर्भाव होतो. ही गोष्ट ह्या निर्णयाशी संबंधित असलेल्या अधिकारी व्यक्तींना पटवून देणे सोपे नाही.

सलाम : सभासद नसलेल्या देशांतून अधिक वैज्ञानिकांना प्रवेश द्यावा ही सूचना आता त्यांनी मान्य केली आहे. पण दुर्दैवाने आपल्याला ह्या बाबतीत अमेरिकनांशी स्पर्धा करावी लागते. श्रीएस्तला मी काय करतो, तर अविकसित देशांना अधिक सवलती देतो. आणि सी. इ. आर्. एन्. येथे पण अशीच तजवीज करण्यात यावी असे मला वाटते. फर्मी प्रयोगशाळेतील प्रवेगकाचा विकसनशील देशांना उपयोग करता यावा यासाठी त्यांना साहाय्य करण्यासाठी तेथे प्रोफेसर लेडरमान एक छोटे केंद्र ( cell ) संघटित करण्याची योजना आखीत आहेत हे

$ *CERN* : प. युरोपीय राष्ट्रांची जिनेव्हा येथे असलेली सहकारी संशोधन संस्था.

कदाचित तुम्हाला समजले असेल. ह्या आपल्या कल्पना आपण सतत रेटीत राहिले पाहिजे.

उद : एका प्रकल्पाची कल्पना मी सध्या रेटीत आहे. तिसऱ्या जगातल्या कुठल्यातरी ठिकाणी एक मोठाली प्रयोग-सुविधा उपलब्ध करून द्यावी आणि विकसनशील देशांनी परस्पर-सहकार्याने ती घडविलेली असावी ही मूल कल्पना.– म्हणजेच ह्या एक टी. सी. डी. सी. § प्रकल्प असेल. एक अजस्त्र विषुववृत्तीय रेडियो दुर्बीण बनवावी आणि तिला जोडून अवकाश विज्ञान आणि इलेक्ट्रॉनिक्स ह्यांविषयीची संशोधन-संस्था संघटित करावी अशी ही योजना आहे. आमची उटी येथील जी रेडिओदुर्बीण आहे तिच्यापासून मिळालेल्या अनुभवावर ह्या दुर्बीणीची रचना ( डिझाइन ) आधारलेली आहे, पण तिची शक्ती दसपट अधिक असेल, आणि तिच्या रचनेच्या विशिष्ट स्वरूपामुळे ती विषुववृत्तावर किंवा विषुववृत्ताच्या अगदी जवळ बसवावी लागेल. तिची वैशिष्टये अशी, की एक तर खगोलशास्त्राच्या आजच्या अगदीच सीमांवर वापरण्याचे ते एक निरीक्षण-साधन असेल, आणि तरीही आज विकसनशील देशांत जे तंत्रज्ञान उपलब्ध आहे त्याच्या जोरावर ती बनविता येईल आणि तुलनेने तिच्यासाठी पैशाची गुंतवणूक फार करावी लागणार नाही.– पाच वर्षांच्या अवधीत २ कोटी डॉलर्स एवढी रक्कम यासाठी पुरेशी असेल. आणि शिवाय ह्या योजनेत सहभागी होणाऱ्या देशांना तिच्यापासून आनुषंगिक तंत्रज्ञानविषयक लाभ तावडतोब मिळू लागतील. प्रगल्भ तंत्रज्ञानाच्या अत्यंत महत्त्वाच्या विभागांना– उदा. सूक्ष्म लहरी (मायक्रोवेव्ह्ज) आणि अँटीना व्यवस्था; उपग्रहाधिष्ठित आणि अन्य मार्गांनी होणारे संदेशवहन ( कम्युनिकेशन ) इ. क्षेत्रांत त्यांची कुवत पद्धतशीर रीतीने वाढू लागेल. युनेस्कोचे डिरेक्टर– जनरल यांनी ह्या योजनेविषयी आस्था दाखविली आहे. तिच्यासाठी एक कृतिसत्र आयोजित करायला आणि एक प्रकल्प-अहवाल तयार करायला युनेस्कोने आम्हाला साहाय्य केले. हा प्रकल्प-अहवाल आम्ही तयार करून दोन वर्षे झाली आहेत. आता पुढचा प्रश्न म्हणजे पैशाची जुळवाजुळव कशी करावी हा आहे. यु. एन्. सी. एस्. टी. डी. नंतर जो मध्यावधी निधी ( इंटेरिम फंड ) जमविण्यात आला आहे तो इतका तुटपुंजा आहे, की त्यांच्याकडे ह्या प्रकल्पासाठी काही मागावे हा विचारही मनात आणता येत नाही.

सलाम : होय. विकसनशील देश व्हिएन्ना येथे वर्षाला २०० कोटी डॉलर्सची मागणी करीत होते. त्याच्या तुलनेने श्रीमंत देशांनी मध्यावधी निधी म्हणून दोन वर्षांसाठी २५ कोटी डॉलर्स द्यायचे मान्य केले आणि माझी माहिती अशी आहे की, आतापर्यंत फक्त ४ कोटी डॉलर्स द्यायची वचने देण्यात आली आहेत.

उद : परिस्थिती ह्याच्याहीपेक्षा अधिक वाईट आहे. मध्यावधी निधीसाठी जे चार कोटी डॉलर्स देऊ असे वचन देण्यात आले होते, त्यांतील जेमतेम फक्त एक कोटी डॉलर्स प्रत्यक्षात जमा झाले आहेत.

सलाम : इटालिअन सरकारने एका आंतर्राष्ट्रीय घन–अवस्था–भौतिकीच्या प्रयोगशाळेसाठी पैशाची मदत करावी म्हणून त्याचे मन वळविण्याचा प्रयत्न आम्ही करीत आहोत. ही प्रयोगशाळा म्हणजे ह्या विषयातील देवाण–घेवाणीचे एक केंद्र असेल. आणि एकमेकांना केवळ माहितीच पुरवण्यात येईल असे नाही, तर विकसनशील देशांतील वैज्ञानिकांना प्रयोगासाठी जी वेगवेगळ्या प्रकारची विशिष्ट द्रव्ये (मटीरिअल्स) अल्प प्रमाणात बऱ्याच वेळा लागतात ती त्यांना ह्या प्रयोगशाळेतून प्रत्यक्षात पाठविण्यात येतील–ही प्रयोगशाळा म्हणजे एक वैज्ञानिक 'कोठी' असेल. दुसरी गोष्ट अशी की, तेथे उच्च दर्जाचे संशोधनही करण्यात येईल. तिसरी गोष्ट म्हणजे ज्याला

§ विकसनशील देशांनी परस्परांत अधिकाधिक तांत्रिक सहकार्य करावे ही संकल्पना.



अनुक्रमणिका

'दमछाक' भौतिकी (फटीग फिजिक्स) म्हणतात,–उपकरणे (डिव्हाइस) निकामी कशी होतात? ह्यासंबंधीचे संशोधन ह्या प्रयोगशाळेतील एक मोठी शाखा असेल. आता मला तुमची मते माहिती आहेत, पण ही प्रयोगशाळा जर इटलीमध्ये बांधण्यात येणार नसेल तर तिला इटलीचे सरकार आर्थिक साहाय्य देणार नाही. ह्या प्रयोगशाळेचे स्वरूपच असे आहे, की तिच्यासाठी आवश्यक असलेले आर्थिक बळ पुरविण्यात एखाद्या विकसनशील देशाने पुढाकार घेतला नाही तर ती विकसनशील देशात अस्तित्वात येणे शक्य नाही.

उद : तेलावर श्रीमंत झालेल्या देशाला तिच्यासाठी पैसे द्यायला तुम्ही प्रवृत्त करू शकणार नाही का?

सलाम : तेल-श्रीमंत देशांच्या बाबतीतील अडचण अशी आहे, की त्यांच्यामध्ये विज्ञानाविषयीची जाणीव अतिशय कमी आहे. विशेषत: शुद्ध विज्ञानाविषयीची कदर समाजात फैलावायची तर तिला खूप वेळ लागतो. उदा. मी नुकतीच एका अति तेल-संपन्न देशातील एका अग्रेसर अणु-वैज्ञानिकाशी चर्चा केली– स्वत:ची प्रयोगशाळा आणि युरोप अमेरिकेतील मोठाल्या प्रयोगशाळा यांच्यामध्ये येरझाऱ्या घालणाऱ्या वैज्ञानिकांपैकी आहे तो. मी त्याला त्याच्या प्रयोगशाळेच्या भावी योजना काय आहेत असा प्रश्न केला, तेव्हा आपण सौर-ऊर्जेवर आणि त्यातही नवीन साधने मध्य-पूर्वेतील प्रत्यक्ष परिस्थितीत कितपत उपयोगी ठरतील ह्याची प्रात्यक्षिके करण्यावर लक्ष केंद्रित करणार आहोत असे तो म्हणाला. 'पण मूलभूत भौतिकीचे काय?' मी विचारले. त्याने जे उत्तर दिले ते अतिशय लक्षणीय आहे. "आमच्या देशातील व्यापार आणि वाणिज्य यांची आहे, ज्याच्यापासून तावडतोब लाभ मिळू शकेल अशाच गोष्टींना आम्ही महत्त्व देतो. आमचा मूलभूत विज्ञानात रस नाही."

उद : आणि हे एका वैज्ञानिकाने म्हटले?

सलाम : तो त्यांचा सर्वोत्कृष्ट वैज्ञानिक आहे.

उद : म्हणजे ही लोकशिक्षणाची प्रक्रिया खूपच वेळ घेणार आहे तर!

सलाम : आपले स्वदेशी मित्रही जेव्हा ह्या अशा सर्व तऱ्हांचे युक्तिवाद वापरताना दिसतात, तेव्हा ही एक दीर्घकालीन प्रक्रियाच राहील, हे उघड आहे. आपल्या लोकांची 'मेंदूधुलाई' फार मोठ्या प्रमाणावर झाली आहे. म्हणून माझ्या अलिकडच्या भाषणांत मी आपल्या भूतकालीन वैभवावर फार भर देतो. अरब राष्ट्रांमध्ये ही जरूर ती सुप्त कुवत आहे अशी माझी पक्की खात्री आहे. त्यांच्या थोरवीचा जो गेला कालखंड होता त्यावेळी त्यांनी खरोखरीच प्रचंड झेप घेतली होती. माझी अशी भावना आहे, की त्यांनी पूर्वी विज्ञानात जी कामगिरी पार पाडली होती तिची त्यांना सतत दहा वर्षे जर आठवण करून देण्यात आली – आणि एवढ्या अवधीत त्यांना सध्याच्या इतर उपक्रमांवर पैसे खर्च करण्याचा कंटाळाही यावा – की मग ते मूलभूत गोष्टींकडे वळतीलही. मला भीती वाटते ती इतकीच, की तोपर्यंत त्यांची श्रीमंती कदाचित संपुष्टात आली असेल. पण मी निराश झालेलो नाही. माझे काही मित्र तेथे आहेत. उदा. सौदी अरेबियात 'फ्यूजन'¶ संशोधनाची योजना ते आखीत आहेत. पण मला अजून कामाची दहापंधरा वर्षे काय ती शिल्लक आहेत. तेव्हा ही जी माझी सर्व प्रवचने सुरू आहेत त्यांची फळे मला दिसतील की नाहीत हे सांगता येत नाही.

उद : हा. पण असे नाही का, की ज्यांची फळे आपल्या स्वत:च्या आयुष्यात आपल्याला पाहायला मिळतील तेवढ्याच गोष्टी जर माणसे करीत राहिली असती तर माणसाची फारशी प्रगती झाली नसती?

---

¶ 'फ्यूजन : दोन परमाणूंचा संयोग करून ऊर्जा निर्माण करण्याची प्रक्रिया.

## संपादकीय, ' फिजिक्स न्यूज, मार्च १९८१ '.

प्रा. अब्दुस सलाम यांच्याबरोबरच्या माझ्या संवादाच्या वाचकांशी झालेल्या संभाषणांतून उद्‌भवलेली काही टीकाटिप्पणी पुढे दिली आहे :

" आपण एकलकोंडे बनलो होतो असे जे प्रा. सलाम दाखवून द्यायचा प्रयत्न करीत आहेत ते खरे नाही," विज्ञानाचा एक इतिहासकार सांगतो आणि पुढे म्हणतो, "बाहेरच्या जगाशी आपले विस्तृत प्रमाणावर व्यापारी संबंध होते आणि ह्याचा कागदोपत्री भरपूर पुरावा आहे." "वस्तूंचा, मालाचा व्यापार असेल" मी म्हणतो, "पण बौद्धिक देवाणघेवाण होती का ? विशेषत: युरोपमध्ये जेव्हा आधुनिक वैज्ञानिक पद्धती विकसित व्हायला लागली त्या कालखंडात बौद्धिक देवाणघेवाण होती का ? आणि अलिकडच्या भूतकाळात, फार पूर्वी नव्हे, समुद्र ओलांडायचे धाडस करणाऱ्या कुणालाही परतल्यावर प्रायश्चित्त घ्यावे लागत असे हे खरे नाही का ? " "पण जयसिंगाला गॅलिलिओ आणि न्यूटन ह्यांची माहिती होती," त्याने आपले आक्षेप चालू ठेवले, "जेसुइटांकडून त्याला त्यांची माहिती मिळाली होती आणि जयसिंगाच्या हस्तलिखितात गॅलिलिओ आणि न्यूटन यांचा उल्लेख आहे." "पण गॅलिलिओ आणि न्यूटन यांच्या कामगिरीतून जे नवीन विज्ञान उदयाला येत होते त्याचा अर्थ आणि महत्त्व ह्याची समज त्याला आली होती का ? " मी विचारतो. "विज्ञानात ज्या नवीन घडामोडी घडून येत होत्या त्यांचा अभ्यास करण्यासाठी काही तरुण युरोपला पाठवायचा प्रयत्न त्याने केला का ? किंवा भारतात त्यांचा अभ्यास व्हावा ह्यासाठी एखादी पाठशाळा स्थापन करून तिला आश्रय देण्याचा प्रयत्न त्याने केला का ? गॅलिलिओ, न्यूटन यांची माहिती किंवा जाणीव त्याला खरोखर होती की नाही ह्याचा निर्णय करण्यासाठी हा निकष मी स्वीकारीन– त्यांची नावे त्याच्या हस्तलिखितात सापडतात की नाही हा त्याचा निकष मी मानीत नाही. आजघडीला ह्याच प्रकाराने आपण एकलकोंडे असतो तर त्याचा अर्थ असा असता, की अमेरिकन्स किंवा युरोपिअन्स किंवा जपानी अणु-ऊर्जेचा वापर करीत आहेत, किंवा अवकाशात उपग्रह सोडीत आहेत किंवा औष्णिक अणुकेंद्रीय ( थर्मोन्युक्लिअर फ्युजन ) घडवून आणण्याच्या उंबरठ्यावर आहेत किंवा जननिक अभियांत्रिकीच्या (जेनेटिक एंजिनिअरिंग) किंवा मूलभूत कणांच्या किंवा पुंजयामिकीच्या (क्वाँटम मेकॅनिक्सच्या) किंवा सापेक्षतेच्या क्षेत्रात काही नवीन शोध लावीत आहेत हे 'ज्ञान' आपल्याला आहे; पण ह्या बाबतीत स्वत:चे संशोधन कार्यक्रम सुरू करायची प्रेरणा ह्या ज्ञानामुळे आपल्याला होत नाही– इतरांच्या संशोधनातून निर्माण होणाऱ्या गोष्टी विकत घेण्यावर ( किंवा त्यांची भीक मागण्यावर ) आपण समाधानी राहतो. ह्या क्षेत्रांत इतर लोक काही तरी करीत आहेत एवढेच ज्ञान जर आपल्याला असेल आणि त्यातून कृतीची प्रेरणा मिळत नसेल तर ते असून नसल्यासारखे आहे; किंबहुना ते अज्ञानाहून हानिकारक आहे."

"प्रा. सलाम यांच्या भेटीमुळे तरुण भारतीय विद्यार्थ्यांना कण-भौतिकीच्या क्षेत्रात उतरायला उत्तेजन मिळेल आणि हा तिचा एक अनिष्ट परिणाम ठरेल असे तुम्हाला वाटत नाही का ?" त्यावेळी भारतात भेटीसाठी आलेल्या एका भारतीय भौतिकशास्त्रज्ञाचा प्रश्न. 'हा धोका मला अजिबात दिसत नाही' – माझे उत्तर. 'आपल्या देशात हुषार तरुणांनी आय्. ए. एस्. मध्ये शिरावे किंवा बँकेतील सुखासीन नोकरी पतकरावी किंवा 'मॅनेजमेन्ट कोर्स' घेऊन आपली बुद्धी 'सेल्स प्रमोशन 'मध्ये वाया दवडावी यासाठी एवढे सामाजिक दडपण आहे, की ह्या प्रकारचा धोकाच इथे नाही. सलाम यांच्या भेटीमुळे आमच्यातील अतिशय हुषार तरुणांना संशोधनात, विशेषत: कण-भौतिकीतील संशोधनात उतरण्याची संधी मिळाली तर मला आनंदच होईल."

दुसऱ्या एका सहकाऱ्याला– हासुद्धा कण-भौतिकशास्त्रज्ञ आहे– जी चिंता वाटते आहे ती आमच्या संवादात मूलभूत संशोधनावर आणि 'उत्कृष्टतेच्या केंद्रां'वर जो भर देण्यात आला आहे









त्याच्यामुळे. "आपल्यासारख्या गरीब देशात मूलभूत संशोधनावर पैसा खर्च करण्याचे समर्थन आपण कसे करू शकू ?" तो अपराधी स्वरात विचारतो. आपण इतिहासकाराला वर जे उत्तर दिले आहे, त्याच्यातच ह्या प्रश्नाच्या उत्तराचा एक भाग अध्याहृत आहे. तांत्रिक विकासापासून परत अलग पडायची आपली जर इच्छा नसेल– आणि आज मूलभूत विज्ञानात जी प्रगती होत आहे तिच्यापासून ह्या तांत्रिक विकासाला अधिकाधिक आणि जलद गतीने चालना मिळत आहे– तर ज्ञानाच्या क्षेत्राच्या सीमा जेथे रुंदावत आहेत तेथे होणाऱ्या घडामोडींत आपण जोमदारपणे भाग घेत असणे आवश्यक आहे. नाही तर आपले परावलंबित्व आपण झटकून टाकू शकणार नाही. आपण जर स्वावलंबी व्हायचे असेल तर ज्ञानाच्या क्षेत्रात जगभर जो विकास होत आहे, त्याच्या आघाडीवर आपण राहिले पाहिजे. एवढेच नव्हे, तर उत्कृष्ट गुणवत्तेची काही केंद्रे स्थिरपणे चालविता येतील एवढा दर्जा ह्या संशोधनात आपण टिकविला पाहिजे. ह्यासाठी मूलभूत संशोधनामध्ये काही गुंतवणूक करणे पूर्णपणे अटळ मानले पाहिजे. आणखी एक गोष्ट ह्या संदर्भात ध्यानात ठेवणे इष्ट ठरेल. शेतकी, अणु–ऊर्जा, अवकाश आणि औद्योगिक संशोधन ह्या क्षेत्रांत उपयोजित संशोधन आणि विकास यांच्यावर आपण जो पैसा खर्च करतो त्याचा अल्पसा भाग काय तो आपण मूलभूत संशोधनावर खर्च करीत असतो.

अणु–ऊर्जेचा औद्योगिक क्षेत्रात वापर करणाऱ्या आगामी युगासाठी पूर्वतयारी करावी हा विचार जेव्हा प्रा. होमी भाभा यांच्या मनात आला, तेव्हा मूलभूत संशोधनाला वाहिलेली संस्था उभारण्याच्या कामाला त्यांनी जी सुरुवात केली ती उगीच नव्हती.

१९७० मध्ये ट्रीस्ट येथे प्रा. सलाम यांनी 'विकसनशील देशांतील वैज्ञानिक धोरण' ह्या विषयावर जी बैठक आयोजित केली होती, तिच्यात बोलताना प्रा. हान्स बेथ यांनी केलेल्या एका विधानाची आठवण ह्या संदर्भात होते. टी. आय्. एफ्. आर. चा उल्लेख करून ते पुढे म्हणाले, "भारतासारख्या देशात अशा अधिक संस्था निर्माण होण्याची, एकाहून अधिक उत्कृष्टतेची केंद्रे असण्याची वेळ आली आहे"

"इतर विकसनशील देशांहून भारत वेगळा आहे– विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्याकडे अर्थपूर्ण आणि सर्वसमावेशक दृष्टीने त्याला पाहता येईल ह्या टप्प्यावर तो आला आहे" असे विधान प्रा. सलाम यांनी अनेकदा केले आहे. ही चांगली गोष्ट आहे, नाही का ?" एक सहकारी म्हणतो. "होय आणि नाही," मला म्हणणे भाग पडते. "आपण आता अविकसित नाही ह्याची बाहेरून आलेल्या निरीक्षकांनी आपल्याला आठवण करून द्यावी लागते ही खेदाची गोष्ट आहे. आपण जी कामगिरी बजाविली आहे, जो बळकट पाया रचला आहे आणि भावी विकासाची जी समर्थता आपल्या अंगी आहे तिची ओळख त्यांना पटते, आपल्याला नाही. आपल्या संस्थांवर अतिरेकीपणे विघातक टीका करण्याचा आपल्याला छंद जडला आहे, आत्मनिंदेचे फटकारे स्वतःला मारण्यात आपल्याला आनंद वाटतो. ह्या संस्था अधिक दृढ करण्यावर, त्यांची ताकद वाढवून त्यांच्यापुढे अर्थपूर्ण अशी अधिकाधिक आव्हाने उभी करण्यावर आपण लक्ष केंद्रित करीत नाही. आपले धैर्य एकवटून प्रगतीची भरारी मारण्यासाठी आपण कधी सिद्ध होणार ?"

न. भा. ४

अनुक्रमणिका






# आंतरजातीय विवाह : एक शास्त्रीय दृष्टिकोण

ल. वि. कुलकर्णी

---

हिन्दू समाजाचे वैशिष्टय जातिव्यवस्था हे आहे. या जाती शेकडो वर्षे माणसांनी टिकवल्या आहेत. जातिव्यवस्थेमागे जी भूमिका आहे, तसेच जाती टिकविण्याचे जे महत्त्वाचे साधन – बेटी-बंदी– तिला काही शास्त्रीय आधार आहे का ? याउलट आंतर-जातीय विवाहांचा पुरस्कार उपलब्ध वैज्ञानिक माहितीच्या आधारे होऊ शकतो का ? या लेखामध्ये या प्रश्नांची उत्तरे देण्याचा प्रयत्न केला आहे. या विषयावर मानववंशशास्त्र व जननशास्त्र यांत झालेल्या महत्त्वाच्या संशोधनाचा उपयोग मी केला आहे.

जातिव्यवस्थेचा शास्त्रीय अभ्यास ब्रिटिश राजवटीत मानववंशशास्त्रज्ञांनी व समाजअभ्यासकांनी सुरू केला. त्याच काळात जातिव्यवस्थेविरुद्ध चळवळीही सुरू झाल्या होत्या; त्यामुळे अशा प्रकारच्या शास्त्रीय संशोधनाला विशिष्ट महत्त्व प्राप्त झाले. विसाव्या शतकाच्या सुरुवातीपासून भारतीय शास्त्रज्ञांनीही या विषयात रस घेऊन संशोधन सुरू केले. स्वातंत्र्य मिळाले तेव्हा भारतातील काही विचारवंतांची अशी कल्पना होती, की जातिव्यवस्थेचे आयुष्य संपत आलेले असून लोकशाहीच्या छत्राखाली, आधुनिकीकरण, शहरीकरण व औद्योगिकीकरण यांच्या प्रभावामुळे थोड्याच काळात ती नष्ट होईल; परंतु स्वातंत्र्य मिळून आज पस्तीस वर्षे होत आली तरी जातिव्यवस्थेची ताठरता थोडी कमी होण्यापलीकडे काही फरक पडलेला नाही.

जातिव्यवस्था गेल्या काही दशकांमध्ये शहरी भागांमध्ये तरी थोड्या प्रमाणावर बदललेली आहे, ही गोष्ट खरी. उदा. शहरी भागांमध्ये तरी रोटी-व्यवहारांमध्ये शैथिल्य आले आहे; जातिव्यवस्थेचे सत्ताकेन्द्र पूर्वीप्रमाणे ब्राह्मणांकडे राहिलेले नाही; सामाजिक दर्जाचे जन्माप्रमाणे वाटपही (जन्माने ब्राह्मण म्हणून श्रेष्ठ व जन्माने शूद्र म्हणून कनिष्ठ सामाजिक स्थान मिळणे) शिथिल झाले आहे. आर्थिक दर्जाला महत्त्व प्राप्त झाल्याने सामाजिक दर्जा आर्थिक परिस्थितीवर ठरू लागला आहे, तसेच पारंपरिक उद्योगधंदे पूर्वीइतक्या प्रमाणात बंधनकारक राहिलेले नाहीत. या बदलामुळे जातिव्यवस्थेच्या रचनेत फरक पडले आहेत काय ? नाही. कारण हे बदल जातिव्यवस्थेच्या केवळ कार्यामध्ये झालेले बदल आहेत. त्यामुळे रचना मात्र फारशी बदललेली नाही. जातिव्यवस्थेचा मूलभूत आधार विवाहपद्धती, तिच्यात मात्र फार कमी बदल झाले आहेत. एकीकडे जातिव्यवस्थेची वर वर्णन केलेली कार्ये बंद होत असली तरी दुसऱ्या बाजूला तिला अनेक नवी कार्ये मिळत आहेत. उदा., आपल्या देशातील राजकारणात आज मोठ्या प्रमाणावर जातीजातींमधील तणावाचा वापर करून घेतला जातो. यामुळे एका जातीतील लोकांच्या मनात दुसऱ्या जातीबद्दल असंतोष निर्माण होण्यास व वाढीला लागण्यास मदत होते आणि सामाजिक सुरक्षितता धोक्यात येते.

## वंश व जातींची निर्मिती

उत्क्रांतिवादाप्रमाणे माणूस माकडापासून निर्माण झाला व या प्रक्रियेत निसर्गाने त्याला इतर प्राण्यांपेक्षा श्रेष्ठ बनवले. आज पृथ्वीवर जगणारी सर्व माणसे मेधावी मानव ( होमो सेपिअन ) या एकाच प्राणिवर्गात मोडतात. या सर्व माणसांचे शारीरिक गुणधर्म (रचना व कार्ये) समान आहेत. माणसा–माणसांत असणारे फरक हे फक्त बाह्य स्वरूपाचे असतात. रंग, उंची, केसांचा रंग, डोळ्यांचा रंग रक्त-गट इत्यादींमध्ये असे फरक असू शकतात. त्याचप्रमाणे व्यक्तींच्या दोन गटांमध्येही असे फरक असू शकतात. उदा. एकाद्या गटातील सर्व व्यक्तींचा रंग गोरा असतो तर दुसऱ्या गटातील व्यक्तींचा रंग काळा असतो. अशा शारीरिक गुणधर्मांच्या निरी-






क्षणांवरून व मोजमापांवरून पृथ्वीवरील मानव-जातीची विभागणी वंशांमध्ये केली गेली आहे. हूटनने वंशाची व्याख्या खालीलप्रमाणे केली आहे— "वंश म्हणजे मानवांचा असा मोठा गट, की ज्यातील मानव एकमेकांपासून जरी थोडे भिन्न असले तरी त्यांचे सामान्य शारीरिक गुणधर्म समान असतात. हा गट ज्या नैसर्गिक वातावरणात रहात आलेला असतो त्याहून वेगळ्या वातावरणाशी तो सामान्यतः जुळवून घेऊ शकत नाही व त्याची निर्मिती एकाच पूर्वजांपासून झालेली असते."

प्राचीन काळी पृथ्वीवरील वेगवेगळ्या ठिकाणी साधारणतः एकाच सुमारास माणसाचा उदय झाला. नंतरच्या काळात तो व निसर्ग यांच्यामध्ये जे सतत बदलणारे संबंध होते त्यांतून त्याचा विकास होत गेला. रंग, उंची, केसांचा रंग इ. मध्ये थोडेफार बदल होत जाऊन विशिष्टीकरणाच्या प्रक्रियेतून भिन्न वातावरणांमध्ये भिन्न शारीरिक गुणधर्म असणारे गट निर्माण झाले. त्यांनाच आपण वंश म्हणतो. निग्रो वंशाचे लोक रंगाने काळे आहेत; कारण ते ज्या उष्ण वातावरणात राहतात त्या वातावरणात काळी कातडी योग्य आहे. तसेच गोरे लोक ज्या थंड वातावरणात रहात आले तेथे जगण्यासाठी गोरी कातडी योग्य ठरली व हा गोरा रंग निसर्गाने निवडला व त्याचे स्थिरीकरण झाले. म्हणूनच गोरे लोक जेव्हा एकदम उष्ण वातावरणात जातात, तेव्हा त्या वातावरणाशी जुळवून घेणे त्यांना कठीण जाते. बर्फाच्छादित प्रदेशात जगणाऱ्या काही प्राण्यांच्या अंगावर अत्यंत दाट केस असतात, ज्यांमुळे त्यांचे थंडीपासून रक्षण होते. अशा प्रकारे माणूस व निसर्ग यांच्या संबंधांतून माणसांची शारीरिक जडणघडण झाली आहे.

परंतु त्याचबरोबर निसर्गाने सर्व वंशांना उत्क्रांतीच्या एकाच पातळीवर आणले आहे. वंशा-वंशांमध्ये जरी भिन्न गुणधर्म असले, तरी त्यांचे भिन्नत्व हा त्यांपैकी एकाचे श्रेष्ठत्व व दुसऱ्याचे कनिष्ठत्व ठरवण्याचा पाया होऊ शकणार नाही; किंवा रंग, उंची अशा बाह्य गुणधर्मांचा आधार घेऊन एखादा वंश आपले इतरांवरील वर्चस्व प्रस्थापित करू शकणार नाही. परंतु मानवी मन अशा बाह्य गुणधर्मांकडेच आकर्षिले जाते व त्यांच्या द्वारे श्रेष्ठत्वाचे विचार मांडले जातात. अशा विचारांतूनच हिटलरच्या "आर्यन सुप्रिमसी"चा जन्म झाला होता.

माणूस संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेत असल्यापासून निसर्गावस्था व संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थांमध्ये होता तेव्हापासूनच स्थलांतर करीत आला आहे. ह्या अवस्थेत प्रवासाची साधनेसुद्धा त्याला उपलब्ध नव्हती. परंतु तेव्हा शेतीचा शोध लागलेला नसल्याने तेव्हाचा माणूस जनावरांची शिकार व वनस्पतींपासून मिळणारे अन्न यावरच जगत होता. त्यामुळे अन्नाच्या शोधार्थ त्याने प्रवास केला असावा. अशा स्थलांतरांतून त्याचा इतर वंशांच्या लोकांशी संपर्क झाला. त्यातून मैत्री व युद्धे झाली पण त्याचबरोबर वंशसंकरही झाला. परिणामतः नव्या नव्या मिश्रणांतून शारीरिक गुणधर्मांची देवाण घेवाण झाली व असे मिश्र गटही निर्माण झाले. भारताच्या भौगोलिक स्थानवैशिष्ट्यामुळे भारतात पूर्वीच्या काळी अनेक वंशांचे लोक आले होते. अनेक जननशास्त्रीय व मानववंशशास्त्रीय संशोधनांमधून असे निष्पन्न झाले आहे, की आजच्या भारतातील लोक अनेक वंशांच्या मिश्रणातून निर्माण झालेले आहेत. डॉ. बी. एस्. गुहा[२] यांनी केलेल्या भारतीय लोकसंख्येच्या विश्लेषणानुसार हे वंश निग्रो, प्रोटो ऑस्ट्रोलाईड, मंगोल, मेडिटेरोनिअन, पश्चिमी तिर्यक्शिरस् (Brachycephalic), आर्मेनॉईड, नॉर्डिक इत्यादी असून ते फक्त मिश्र अवस्थेतच आढळतात.

अशी अनेक वंशांचे मिश्रण असलेली भारतीय जनता सांस्कृतिक दृष्ट्या मात्र एकसंध आहे. इतिहासपूर्व काळापासून भारतीय समाजाचे जातींमध्ये विभाजन झाले आहे. जातिव्यवस्थेच्या नावाखाली समाजाची भिन्न गटांत विभागणी करणारी भारतीय संस्कृती ही एकमेव संस्कृती मानवाच्या इतिहासात नोंदली गेली आहे. प्रत्येक मानवी समाजात कोणत्या तरी तत्त्वावर अशी विभागणी केली जाते. असे तत्त्व सामान्यतः आर्थिक दर्जा, धार्मिक गट असे असते. भारतात मात्र– विशेषतः हिंदू समाजात– अशा कुठल्या बाबीपेक्षा अधिक साचेबंद व गुंतागुंतीची विभागणी करणारा घटक 'जात' हा आहे. भारतातील जातिव्यवस्था ही मुख्यतः हिंदुधर्मांतर्गत असून तिच्या निर्मितीची अनेक (अ)शास्त्रीय व

अनुक्रमणिका

एकांगी स्पष्टीकरणे दिली गेली आहेत. परंतु आता असे सिद्ध झाले आहे, की जातीजातीतील उच्च-नीचतेला काहीही शास्त्रीय आधार नाही. ब्राह्मण शारीरिक दृष्टघा शूद्रांपेक्षा भिन्न नाहीत व त्यामुळे अशा आधारावर ते आपले श्रेष्ठत्व सांगू शकणार नाहीत. केवळ सामाजिक इतिहासात प्रभाव गाजवलेल्या मानवी दोषांमुळे वा अपघातांमुळे शेकडो पिढ्या ब्राह्मणांचे व क्षत्रियांचे सामाजिक, आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक बाबतीतले वर्चस्व हिंदू समाजावर लादले गेले. आज जगात सर्वत्र मानवी समानतेची व समान हक्कांची ओरड चालू आहे. आपल्या देशातही ही ओरड गेल्या शतकापासून चालू आहे. परंतु जोपर्यंत समाजव्यवस्थेच्या विविध अंगांमध्ये जातिव्यवस्थेची मुळे खोलवर रुजलेली आहेत तोपर्यंत कायद्याने देऊ केलेली समानता प्रत्यक्षपणे निर्माण होऊ शकणार नाही.

## जातिव्यवस्था टिकण्याची दोन कारणे

जातिव्यवस्था गेली शेकडो वर्षे भारतीय समाजामध्ये टिकून आहे. यासाठी मुख्यतः दोन प्रक्रिया कारणीभूत आहेत. त्या अशा:–

( १ ) सामाजिक निवड (Social Selection):– आर्थिक, धार्मिक, नातेसंबंध इ. साधर्म्यावर आधारित समाजाचे विभाजन झाल्यानंतर असे विभाजित गट एकमेकांपासून वेगळे राहातात व आपापल्या क्षेत्रांत कार्य करतात. उदा. ब्राह्मणांनी फक्त ज्ञानसाधना व धार्मिक विधी करणे, क्षत्रियांनी संरक्षण, वैश्यांनी व्यापार तर शूद्रांनी हलकी कामे करणे. असे गट एकमेकांच्या क्षेत्रांत ढवळाढवळ करत नाहीत. त्याचे इतर गटांशी वागण्याचे नियम ठरतात व ते पाळले जातात.

२) लैंगिक निवड (Sexual Selection ) अथवा विवाहासाठी जोडीदाराची निवड :– विभाजित समाजामध्ये प्रत्येक गट हा इतर गटांपासून स्वतःला वेगळे ठेवण्यासाठी गटांतर्गत विवाह करण्याची पद्धत पाळत राहतो; त्यामुळे इतर गटांशी त्याचा संपर्क मर्यादितच राहतो.

वस्तुतः सामाजिक निवड व लैंगिक निवड या दोन्ही प्रक्रिया परस्परांवर अवलंबून आहेत व त्या परस्परपूरक कार्य करतात. लैंगिक निवड ही सामाजिक निवडीच्या नियमांतर्गत कार्य करते तर सामाजिक गट हे पूर्वापार चालत असलेल्या गटांतर्गत विवाहामुळेच टिकून राहू शकतात. जर सामाजिक निवडीच्या तत्त्वांमध्ये बदल घडत असतील तर ते विवाहसंस्थेतही परावर्तित व्हायला हवेत. वर नमूद केल्याप्रमाणे आपल्या देशात जातिव्यवस्थेत बदल घडत आहेत, हे बदल सामाजिक निवड या तत्त्वातील बदल आहेत. परंतु हे बदल विवाहसंस्थेत मात्र फारच थोड्या प्रमाणात परावर्तित झालेले दिसतात व जोपर्यंत या लैंगिक निवड-तत्त्वांचा अत्यंत ताठरतेने पुरस्कार केला जाईल तोपर्यंत जातीजातींतील अंतर कमी होणे शक्य नाही. आर्थिक, सामाजिक क्षेत्रांमध्ये जातीजातींमध्ये मोठ्या प्रमाणावर संबंध निर्माण झाले आहेत. तरीही आंतरजातीय विवाहाचे प्रमाण मात्र एक टक्क्यापेक्षाही कमी आहे, ही गोष्ट विवाहनियम किती ताठरतेने पाळले जातात हे सिद्ध करावयास पुरेशी आहे.

हिंदूंमध्ये आंतरजातीय विवाहाला जो विरोध होतो, त्यामागे काही सूत्र दिसते. ते पाहण्यासाठी हिंदूंमधील विवाहपद्धतीचे नियम लक्षात घेणे आवश्यक आहे.

## हिंदूंमधील विवाहपद्धतीचे नियम

हिंदूंमधील विवाहपद्धती मुख्यतः चार नियमांवर आधारित आहे. हे नियम विवाहासाठी जोडीदाराची निवड करण्यासाठी मार्गदर्शन करतात. हे नियम जातिव्यवस्थेवर आधारित असून अत्यंत कटाक्षाने पाळले जातात. तथापि शिक्षण, इतर समाजांशी संपर्क इत्यादींमुळे शहरांमध्ये तरी या नियमांचा प्रभाव थोडा कमी झाल्याचे दिसते. हे नियम असे :–

१) **गटांतर्गत विवाहाचा नियम** ( Endogamy ) :– तरुण अथवा तरुणीचा विवाह तो वा ती ज्या गटात जन्माला आलेले आहेत, त्याच गटात व्हावा असा नियम म्हणजे गटांतर्गत विवाहाचा नियम.

भारतात गटांतर्गत विवाहाचा पुरस्कार करणारे सुमारे दोन हजार गट आहेत. यांपैकी काही गटांची लोकसंख्या काही लाखांमध्ये आहे तर काही गट अगदी लहान असून त्यांची लोकसंख्या फक्त काही शेकड्यांमध्ये आहे. अशा गटांमध्ये जोडीदाराच्या

निवडीचे क्षेत्र फारच मर्यादित असते. त्यामुळे एखाद्या व्यक्तीला पसंत नसलेला जोडीदारही पतकरावा लागतो. ह्या परिस्थितीमुळे दोघेही सुखी होत नाहीत.

२) **गटबाह्य विवाहाचा नियम** (Exogamy) :– वर सांगितल्याप्रमाणे गटांतर्गत विवाहपद्धती पाळणारे काही गट खूप मोठे आहेत. त्या गटांमध्ये अनेक लहान लहान उपगट असतात. त्या लहान गटांना हा नियम लागू आहे. विवाहयोग्य व्यक्ती ज्या लहान गटातील असेल त्या गटाबाहेरील इतर गटांमधून तिच्यासाठी जोडीदार निवडला जावा, असे हा नियम सांगतो. त्या व्यक्तीचा गट व तिच्या जोडीदाराचा गट हे दोन्ही एकाच मोठ्या गटातील अगर उपगट असले पाहिजेत. उदा. ब्राह्मणांमध्ये अनेक मोठे गट आहेत. या गटांमध्ये इतर देशस्थ, कोकणस्थ– त्यातही विविध गोत्रे– असे अनेक लहान गट आहेत. एकाच गोत्रातील दोन व्यक्ती या नियमानुसार परस्परांशी विवाह करू शकत नाहीत. पण देशस्थ कोकणस्थ, या तुलनेने मोठ्या असलेल्या गटात मात्र गटांतर्गत विवाहाचाच नियम मोठ्या प्रमाणावर पाळला जातो.

३) **रक्ताच्या नात्यामध्ये विवाह न करण्याचा नियम अथवा सपिंड विवाह टाळण्याचा नियम** :– ज्या व्यक्ती वडिलांच्या बाजूने सात पिढ्यांपर्यन्तच्या व आईच्या बाजूने पाच पिढ्यांपर्यन्तच्या नात्यामधील असतील त्यांनी परस्परांशी विवाह करू नये असे हा नियम सुचवतो. सामान्यतः जवळच्या नातेवाईकांमध्ये विवाह होऊ नयेत असे पाहिले जाते.

उत्तरभारतीय ब्राह्मणांमध्ये हे नियम तीन हजार वर्षांपूर्वी उदयाला आले आहेत असे मानण्यात येते. परंतु हे नियम जवळ जवळ भारतभर पाळले जातात. ब्राह्मणांमध्ये उत्तर भारतीय व दक्षिण भारतीय असा महत्त्वाचा फरक आहे; त्यामुळे दक्षिणेकडे हे नियम शिथिल झालेले दिसतात. तसेच त्यांचे मूळ नियमही या नियमांबरोबरच कार्यान्वित होताना दिसतात. दक्षिणेकडील एकच नियम मुख्यतः अधिक प्रभावी दिसतो. तो असा –

४) **सपिंड विवाह पुरस्कारणारा नियम** :– जवळच्या नात्यांमध्ये विवाह करायला हरकत नसल्याचे हा नियम सुचवतो. याचे पालन कसे करावे, याबाबत अनेक मतभेद आहेत. काही ठिकाणी मुलीचा विवाह तिच्या मामाशी लावावा, अशी पद्धत पाळली जाते; तर काही ठिकाणी मुलाचा विवाह त्याच्या मामाच्या मुलीशी करावा अशी चाल आहे. सामान्यतः चुलत भावंडांमधील विवाह सगळीकडेच निषिद्ध मानण्यात येतो. परंतु त्यालाही काही गट अपवाद आहेत.

महाराष्ट्राचे भौगोलिक स्थान उत्तर व दक्षिण भारतीय संस्कृतीच्या मधोमध असल्याने दोन्हीकडील नियमांचे थोड्याफार प्रमाणात मिश्रण झालेले येथे आढळून येते. रक्ताच्या नात्यातील विवाहाची प्रथा महाराष्ट्राने दक्षिणेकडून उचलली आहे. त्यातही असे दिसते, की महाराष्ट्रातील चित्पावन ब्राह्मण उत्तरेकडील विवाहनियम कडकपणे पाळतात, तर देशस्थ, कऱ्हाडे व सारस्वत ब्राह्मण दक्षिणेकडील पद्धतीचे अनुकरण करतात.

जातीतल्या जातीत गटांतर्गत, इतकेच नव्हे तर सपिंडही (काही जातींमध्ये), विवाह करण्याची जी प्रथा दिसते, व गटबाह्य ( आंतरजातीय ) विवाह मान्य होत नाही त्यामागची कारणे शास्त्रीय दृष्ट्या समर्थनीय आहेत काय, याचा आता विचार करायचा आहे. अशा अमान्यतेमागे सामाजिक, आर्थिक इ. अनेक कारणे असू शकतील; परंतु जननशास्त्रीय अशी कारणे पडताळून पाहणे हे अधिक महत्त्वाचे ठरेल. कारण आंतरजातीय विवाहांचे जननशास्त्रीय दृष्ट्या वाईट परिणाम होतात काय, हा अनुत्तरित प्रश्न हेसुद्धा आंतरजातीय विवाह न करण्यामागील महत्त्वाचे कारण होऊ शकते. मानवी व लोकसंख्या जननशास्त्र (Human and Population Genetics), वनस्पती व प्राणी जननशास्त्र तसेच युजेनिक्स[३] व युथेनिक्स[४] या जननशास्त्राच्या शाखा इत्यादींमधील संशोधनात्मक माहितीचा उपयोग करून आंतरजातीय विवाहाबद्दल काही ठाम मते मांडता येतील.

प्राणी जननशास्त्रानुसार एकाच प्राणिवर्गातील दोन वेगळ्या जातींच्या प्राण्यांच्या संकरातून जन्माला येणारे प्राणी अधिक बलवान असतात व त्यांचे जीवितमूल्यही ( Survival Value) इतरांपेक्षा अधिक असते. मात्र हा संकर सशक्त नर-मादींचा होणे आवश्यक आहे. अशा अपत्यांमध्ये आई व वडील

या दोघांमधील गुण निर्माण होतात. वनस्पती जननशास्त्रानुसार संकरित पिकांमधून अधिक उत्पादन मिळते, असेही सिद्ध झाले आहे. तसेच कलमी फुलझाडांना वेगळ्या रंगाची फुले येतात. एकूण संकरामुळे विविधता व उत्पादन वाढते.

मानवाचे जननशास्त्र अत्यंत गुंतागुंतीचे आहे. तसेच प्राणी व वनस्पती यांच्या बाबतीत जसे संकराचे प्रयोग करता येतात तसे प्रयोग मानवाबाबत केले गेलेले नाहीत; व यापुढेही करणे कदाचित शक्य होणार नाही. परंतु वनस्पती, प्राणी व मानव यांच्या जननशास्त्राची मूलतत्त्वे मात्र सारखीच आहेत.

अनुवंशशास्त्र किंवा जननशास्त्रासाठी असलेला मूळ जेनेटिक्स (Genetics) हा इंग्रजी शब्द जिनस् या मूळ शब्दापासून तयार झाला आहे. "जिन" हे अनुवंशाचे (आईवडिलांकडून मुलांकडे गुणवैशिष्टये घेऊन जाण्याचे) सर्वात लहान परिमाण आहे. दोन व्यक्तींमधील अथवा आईबापांच्या दोन मुलांमधील फरकांना या जिनच कारणीभूत असतात. मूल जन्माला येताना आईकडून तेवीस व वडिलांकडून तेवीस असे एकूण सेहेचाळीस क्रोमोझोमस् व प्रत्येक क्रोमोझोममध्ये विशिष्ट संख्येने जिन घेऊन जन्माला येते. जिन आईवडिलांकडून आपल्याकडे फक्त शारीरिक गुणधर्म, उदा. रक्तगट वाहून नेत नाहीत तर त्याचबरोबर रोगही नेतात. जिन दोन प्रकारच्या असू शकतात–(१) प्रभावी (dominant) व (२) अप्रभावी (recessive).

आईवडिलांकडून आलेल्या जिनची गर्भामध्ये जी जिनरचना निर्माण होते तीत काही जीन प्रभावी ठरतात तर काही अप्रभावी राहतात. प्रभावी जिन मुलामध्ये काही ठळक गुणदोष निर्माण करतात. याउलट अप्रभावी जिन सुप्तावस्थेत राहतात. उदा. आल्बिनो हा दोष असलेल्या मुलाचे आईवडील बाहेरून पूर्णपणे सामान्य दिसणारे असू शकतात; परंतु खरे तर त्यांच्या मुलामधील या दोषाला तेच कारणीभूत असतात. कारण त्यांच्या शरीरातील हा दोष वाहणाऱ्या जिन सुप्त असतात; परंतु मुलांमध्ये मात्र त्या प्रभावी होऊन व्यक्त होतात. एखाद्या कुटुंबात नात्यातल्या नात्यात विवाह होत असतील, तर असे रोग अथवा ठळक दोष हे पिढ्यानपिढ्या अस्तित्वात राहू शकतात. याचे कारण जर आईवडील हे दोघेही समान दोष असणारे असतील तर तो दोष वाहणाऱ्या जिन मुलामध्येही प्रभावी ठरू शकतात. याउलट जेव्हा एकमेकांशी नाते नसणाऱ्या दोन व्यक्तींचा विवाह होतो, तेव्हा त्या दोघांमध्ये कोणाही एकात असणारी दोषवाहक जिन त्यांच्या मुलांमध्ये प्रभावी अवस्थेत निर्माण होण्याची शक्यता कमी होते.

एखाद्या गटातील व्यक्ती गटांतर्गतच विवाह करत असतील तर कालांतराने या गटातील सर्व व्यक्तींच्या जिन मोठ्या प्रमाणावर सारख्या बनत जातात. या समान जिन जर विशिष्ट रोगासाठी कारणीभूत ठरल्या तर असा रोग पिढीकडून वाहून नेला जातो. अल्बिनिझम, अम्यूरोटिक इडिओसी, फेनिल्केटोन्युरिया इ. रोगांबाबत अशी पाहणी करण्यात आली असून तिचे निष्कर्ष असे–[५]

| विवाह प्रकार | रोग्यांची संख्या |
|---|---|
| नात्यात विवाह | – ४०,००० व्यक्तींपैकी – १३ |
| नात्याबाहेर विवाह | – ४०,००० व्यक्तींपैकी – १ |

गटातल्या गटात विवाह करण्यामुळे हेटरोझायगोट निर्माण होण्याची प्रक्रिया थंडावते. हेटरोझायगोट, म्हणजे अशा व्यक्ती की ज्यांच्या जिन एकमेकांपासून भिन्न असतात म्हणजेच त्यांचे शारीरीक गुणधर्मही भिन्न असतात व त्यांच्यांत विविधता असते. परिणामतः होमोझायगोट निर्माण होण्याचे प्रमाण वाढते. होमोझायगोट म्हणजे अशा व्यक्ती की ज्यांच्या जिन समसमान असतात.

आपल्या देशात जवळच्या नात्यामधील विवाह करणाऱ्यांचे प्रमाण किती आहे यासंबंधी काही संशोधन झाले आहे. अर्थात आपली लोकसंख्या एवढी मोठी आहे, की अशा संशोधनावर आधारित निष्कर्ष पूर्णपणे सत्य ठरतीलच असे नाही. परंतु गटांतर्गत जवळच्या नात्यांमध्ये होणारे विवाह आणि आनुवंशिक रोगाचे प्रमाण यांच्यातील संबंध मात्र ठळक आहेत हे सिद्ध झाले आहे. डॉ. संघवी[१] यांनी केलेली एक पाहणी येथे उपयोगी पडेल त्यांनी मुंबईतील बारा गटांतर्गत विवाह करणाऱ्या गटांचा अभ्यास केला. त्यापैकी सात गट मराठी भाषिक असून त्यात देशस्थ व सारस्वत ब्राह्मण, कायस्थ व पाठारे प्रभू, मराठा, आग्री व महार असे होते,

अनुक्रमणिका

तसेच तीन मुस्लिम गट व पारशी तसेच ख्रिश्चन ह्या गटांचाही अंतर्भाव होता. त्यांनी या गटांमध्ये झालेल्या एकूण ६५९७ विवाहांची माहिती गोळा केली व त्या आधारे खालील विश्लेषण केले :

| गटाचे नाव | जवळच्या नातेवाईकामध्ये विवाहाचे प्रमाण दर एक हजारी |
|---|---|
| पारशी | ६ ते १३ |
| ब्राह्मण व प्रभू | १ ते ३ |
| ख्रिश्चन | १ ते ३ |
| इतर | ५ ते ७ |

याचबरोबर पारशी लोकांमध्ये आनुवंशिक रोगांचे प्रमाण सर्वाधिक असल्याचेही आढळून आले आहे.

दुसरी एक पाहणी जपानी व भारतीय लोकसंख्यांचा तौलनिक अभ्यास करून केलेली आहे. ह्या पाहणीचे उद्दिष्ट नात्यातील विवाह व आनुवंशिक रोगांचे प्रमाण यांतील परस्परसंबंध शोधणे हे होते. या पाहणीचे निष्कर्ष असे.[७]

**जवळच्या नात्यातील विवाह**

| | एकूण विवाह | रोगांचे प्रमाण |
|---|---|---|
| जपान | ४८४५ | ६९ (१.४२%) |
| भारत | २८८९ | ४३ (१.४९%) |

**नात्याबाहेर विवाह**

| | एकूण विवाह | रोगांचे प्रमाण |
|---|---|---|
| जपान | ६३७९६ | ६५७ (१.०२%) |
| भारत | २०५९७ | २८६ (१.३८%) |

यूरोपमध्ये अठराव्या शतकात गटांतर्गत विवाहपद्धत पाळणारी काही फार मोठी कुटुंबे होती. या कुटुंबातील व्यक्तींचे विवाह कुटुंबातर्गतच व्हायचे. सातत्याने या पद्धतीने विवाह चालू राहिल्याने कुटुंबातील व्यक्तींमधील विविधता नष्ट होऊन होमोझायगोट निर्माण होण्याचे फारच वाढले. अनेक प्रकारच्या आनुवांशिक रोगांना कारणीभूत ठरणाऱ्या जिन एका पिढीकडून दुसऱ्या पिढीमध्ये पोहोचल्या जाऊन मृत्यूचे प्रमाण वाढले व अखेरीस ही कुटुंबे पूर्णपणे नष्ट झाली.

याउलट, आजपर्यंत खूप मोठ्या प्रमाणावर वंशसंकरही होत आला आहे. निग्रो व गोरे वंश यांमध्ये गेली अनेक शतकें विवाह होत आहेत. या विवाहांमधून जी नवी पिढी निर्माण झाली तिच्यात कोणतेही दोष आढळून आले नाहीतच; पण वंशसंकरातून निर्माण झालेली संतती व एकाच वंशांतर्गत निर्माण झालेली संतती या दोहोंमधील फरक हे रंग, उंची, डोळयाचा रंग अशांपैकी होते. अशा वंशसंकरातून निर्माण झालेल्या संततीमध्ये कोणतेही आनुवांशिक रोग आढळले नाहीत. उलट ते सशक्त होते व ते अधिक जीवित मूल्य[८] (Survival Value) घेऊन जन्माला आल्याचेही दिसले.

जे मत वंशसंकराबाबत मांडले गेले आहे, तेच मत आंतरजातीय विवाहाबाबतही मांडता येईल. आंतरजातीय विवाहितांची मुले हीसुद्धा अधिक सशक्त व अधिक जीवितमूल्य असणारी असू शकतील. त्यांच्यांत आईवडिलांपैकी एकात असणारे दोष निर्माण होण्याची शक्यता कमी असेल व त्यामुळे जातीजातींमधील अंतरेही कमी होतील.

## विवाह ठरवताना जननशास्त्रदृष्ट्या काय पाहणे इष्ट ?

१) गटांतर्गत विवाह असो अथवा गट-बाह्य विवाह असो, रक्तगट तपासून घेणे महत्त्वाचे ठरते. जेव्हा विवाहयोग्य मुलाचा रक्तगट Rh + ve असेल व मुलीचा रक्तगट Rh – ve असेल तरच धोका संभवतो. अशा वेळी पहिल्यांदा गर्भधारणा होते तेव्हा वडिलांचे Rh+ve गटाचे रक्त गर्भात येते व पुढे आईच्या Rh–ve रक्ताशी संयोग पावते. पहिले मूल सुखरूपपणे जन्मते; पण पुढे दुसऱ्या गर्भधारणेच्या वेळी गर्भात संयोग पावलेल्या रक्ताच्या गाठी बनण्याचा संभव असतो. त्यामुळे पुढची मुले जगत नाहीत किंवा जन्मतःच विकृती घेऊन जन्माला येतात.

भारतीय लोकसंख्येमध्ये सुमारे ९३ टक्के स्त्रीपुरुषांचे रक्त Rh+ve याच गटाचे आहे व फक्त ७ टक्के स्त्रीपुरुषांचे रक्त Rh–ve गटाचे आहे. त्यातूनही फक्त जेव्हा पुरुषाचे रक्त Rh+ve व स्त्रीचे रक्त Rh–ve गटाचे असेल तेव्हाच अशी शक्यता असते. रक्त–गट या उलट असतील तेव्हा नाही. तरीही विवाहापूर्वी रक्तगट तपासून घेणे योग्य ठरेल.

२ ) तिर्यक् शिरस् ( Brachycephalic ) पुरुष व ऊर्ध्वशिरस् ( Dolichocephalic ) [९] स्त्री यांचा विवाह झाल्यास मूल जन्मायच्या वेळी स्त्रीला अत्यंत त्रास होण्याचा किंवा मूल मृतावस्थेतच जन्मण्याचा संभव असतो. कारण गर्भाचे डोके हे तिर्यक् ( आडवे ) असल्यास ते स्त्रीच्या निमुळत्या कंबरेच्या हाडांमुळे अडते व त्याचा मृत्यू ओढवू शकतो. अशी काही उदाहरणे मंगोल व कॉकेशॉइड यांच्या बाबतीत आढळून आली आहेत. मंगोल लोक तिर्यक्–शिरस् असून कॉकेशॉईड ऊर्ध्वशिरस् असतात. मंगोल पुरुष व कॉकेशॉइड स्त्रिया यांच्या विवाहातून फार कमी मुले नीटपणे जन्माला येऊ शकली.

अशी उदाहरणे भारतात मात्र शोधण्याचा प्रयत्न झालेला नाही.

३ ) विवाहयोग्य मुलगा व मुलगी यांना आनुवांशिक किंवा गंभीर रोग आहेत काय ? त्यांचे वजन व उंची यांचे परस्पर प्रमाण अगदीच अयोग्य आहे काय ? इ. गोष्टींचा विचार करणेही आवश्यक आहे.

विवाह ठरवताना या शास्त्रीय बाबींचा विचार करणे योग्य ठरेल; परंतु शैक्षणिक, आर्थिक, सामाजिक दृष्ट्या एकमेकांना सुयोग्य अशा तरुण-तरुणींना जातिशुद्धतेच्या नावाखाली विवाहाचा हक्क नाकारण्याचे काहीच कारण नाही.

## संदर्भ व टीपा

१. हूटन ई. ए. – " Up From The Ape ", New york, Macmillan, १९४६.

२. डॉ. बी. एस. गुहा – " An Outline of the Racial Ethnography of India ", Calcutta, १९३७.

३. युजेनिक्स – जननशास्त्राची अशी शाखा, की जीत जननशास्त्राचे नियम मानवजातीच्या सुधारणेसाठी कसे वापरता येतील याचा अभ्यास केला जातो.

४. युथेनिक्स– जन्मानंतर व्यक्तींच्या सुधारणेसाठी काय करता येईल याचा अभ्यास युथेनिक्स या जननशास्त्राच्या शाखेत केला जातो.

५. ब्रिअर्ले जे. के. – " Biology and Social Crisis ".

६. डॉ. एल. डी. संघवी– " Frequency of Consanguineous Marriages in Twelve Endogamous Groups in Bombay." – Aeta Genet, Basel, 6 : 41–49. १९५६.

७. डॉ. एल. डी. संघवी व इतर– " Effect of Inbreeding on the Incidence of Congenital Malformation " – Paper Presented at the XII International Congress of Genetics, Tokyo, १९६८.

८. जीवितमूल्य – विशिष्ट नैसर्गिक परिस्थितीमध्ये टिकून राहण्याची विशेष क्षमता.

९. तिर्यक शिरस्, ऊर्ध्व शिरस् व मध्यम शिरस् – डोक्याचा आकार ठरवण्यासाठी जे सूत्र मांडले गेले आहे ते असे —

$$\frac{\text{डोक्याची रुंदी}}{\text{डोक्याची उंची}} \times १०० \text{ याला " सिफॅलिक प्रमाण" असे नाव आहे.}$$

या प्रमाणाप्रमाणे डोक्याचे तीन प्रमुख प्रकार मानले जातात ते असे :

अ) ऊर्ध्वशिरस् (Dolichocephalic) लांब व निमुळते– प्रमाण– ७०.०० ते ७५.९०

ब) मध्यमशिरस् (Mesocephalic) मध्यम–७६.०० ते ८०.००

क) तिर्यक् शिरस् ( Brachycephalic ) रुंद– ८१.०० ते ८५.००

---

अनुक्रमणिका

# नोबेल पारितोषिके : १९८१

अशोक नारायण ठाकूर

या वर्षीच्या नोबेल पारितोषिकांच्या मानकऱ्यांच्या यादीवर नजर टाकली असता तिच्यातील अमेरिकनांचे वर्चस्व चटकन लक्षात येते. वैद्यकाचे दोघे, भौतिकीचे दोघे व रसायनशास्त्राचा एक असे विज्ञानातील एकूण आठ मानकऱ्यांपैकी पाचजण अमेरिकन असल्याचे दिसून येते. शिवाय या वर्षीचे अर्थशास्त्राचे नोबेल पारितोषिकही एका अमेरिकन अर्थशास्त्रज्ञानेच पटकाविले आहे. याचा अर्थ पाश्चात्त्य देशांत व त्यातूनही अमेरिकेत मूलभूत संशोधनाला अधिक अनुकूल परिस्थिती असावी, असे दिसून येते. जपान हा देश तंत्रज्ञानात खूप पुढे गेला असला, तरी तेथे मूलभूत संशोधनापेक्षा अशा संशोधनाचा उपयोग करून घेण्याचीच प्रवृत्ती अधिक आढळते. मात्र या वर्षीच्या रसायनशास्त्राच्या नोबेल पारितोषिकाचा मान एका जपानी शास्त्रज्ञालाही लाभला आहे. हे शास्त्रज्ञ म्हणजे केनिची फुकुई हे होत. मात्र त्यांच्या ज्या संशोधनासाठी त्यांना हा बहुमान मिळाला आहे, त्याच्याकडे खुद्द जपानी शास्त्रज्ञांचेही दुर्लक्षच झाले. कारण हे संशोधन पंचवीस वर्षांपूर्वीचे आहे. पारितोषिकाची घोषणा झाल्यावर त्यांनी काढलेल्या उद्गारांवरून पाश्चात्त्य व पौर्वात्य देशांची विज्ञानाकडे पाहाण्याची वृत्ती किती वेगळी आहे, हेच दिसून येईल. ते म्हणाले, "नवीन सिद्धांताच्या बाबतीत जपानी लोक अगदी रूढमार्गवादी वा परिवर्तनविरोधी आहेत; परंतु एकदा का तुमच्या कार्याचे महत्त्व अमेरिकेत वा युरोपात मान्य झाले की, मग मात्र जपानमध्ये त्याचा उदोउदो होऊ लागतो." अर्थात भारत वा एकूण पौर्वात्य जगातच यापेक्षा वेगळी स्थिती नाही.

देशादेशांमधील बंधुभाव वाढविण्यासाठी केलेल्या सर्वोत्कृष्ट कार्याला शांततेचे नोबेल पारितोषिक देण्यात यावे, अशी ॲल्फ्रेड नोबेल यांची अपेक्षा होती आणि ओघानेच त्यामुळे संघर्ष मिटतील व मतभेद सरतील अशी त्यांना आशा होती. मात्र याच पारितोषिकाच्या बाबतीत जास्तीत जास्त मतभेद झालेले दिसून येतील. विशेषतः अलीकडच्या काही शांतता पारितोषिकांमुळे बंधुभाव वाढीला लागण्याऐवजी मतभेदांनाच चालना मिळाल्यासारखे झाल्याचे दिसून येईल. उदाहरणार्थ, व्हिएतनामी युद्धाच्या समाप्तीबद्दल हेन्री किसिंजर व ली डक थो यांना देण्यात आलेले १९७३ चे शांततेचे नोबेल पारितोषिक (अर्थात थो यांनी ते नाकारले ही गोष्ट वेगळी) आणि कँप डेव्हिड समझोत्यासाठी मेनाचिम बेगीन व अन्वर सादात यांना देण्यात आलेले १९७८ चे नोबेल पारितोषिक. म्हणूनच बहुधा या वर्षी असा वाद टाळण्यासाठी लेश वॉलेसा या पोलंडमधील कामगारनेत्याचे नाव टाळून जिच्यावर टीका होणार नाही अशी एक सेवाभावी संस्था या पारितोषिकासाठी निवडली गेली असावी. मात्र यामुळे टीका होणे थांबले नाही ते नाहीच. पूर्वी पुष्कळदा जशी टीका झाली तशी ही टीका नाही, हे मात्र खरे. या वर्षीच्या पाचजणांच्या या पारितोषिकाच्या नॉर्वेजियन नोबेल समितीवर पुढील आरोप करण्यात आला आहे : अतिशय रूढमार्गाने जाणारी व टीकेच्या दृष्टीने 'सुरक्षित' अशी संस्था पारितोषिकासाठी निवडून समितीने मतभेदांना फाटा देण्याचा प्रयत्न केला आहे. ही संस्था म्हणजे संयुक्तराष्ट्रांचा निर्वासितांसाठी असलेला उच्च आयोग होय. ही संस्था १ जानेवारी १९५१ रोजी स्थापन झाली असून तिचे मुख्य कार्यालय जिनिव्हा येथे आहे.

या संस्थेच्या कार्यकारी समितीची बैठक गेल्या ऑक्टोबरात जिनिव्हा येथे झाली होती. तेव्हा संस्थेची अकार्यक्षमता आणि खालावलेले नीतिधैर्य यांसंबंधी होत असलेल्या टीकेवरही चर्चा झाली होती. डेन्मार्कचे माजी पंतप्रधान पॉल हार्टलिंग हे या संस्थेत १९७८ सालापासून उच्च पदावर असून सध्या ते संस्थेचे आयुक्त आहेत. वरील बैठकीत काहींनी त्यांच्या हेतूंवरच टीका केली होती; तर नोकरशाहीवर काबू मिळविण्याचे नेतृत्वगुण त्यांच्यात नाहीत असे काहींना वाटते. काही स्वतंत्र









अनुक्रमणिका

निर्वासित संघटनांची या संस्थेवर होणारी टीका तर अधिकच गंभीर स्वरूपाची आहे. कारण ही संस्था निर्वासितांना संरक्षण देण्यास पुरेशी आक्रमक नाही, असे या संघटनांना वाटते. या संबंधात संस्थेला अलीकडे आलेल्या काही अपयशांची उदाहरणे दिली जातात. एक म्हणजे १९७९ साली थायलंडने ६० हजार निर्वासित कांपुचियात परत पाठविले; पण ते थोड्याच दिवसांत परत निर्वासित झाले. दुसरे उदाहरण म्हणजे गेल्या वर्षी चीनमधून निसटून आलेले १० हजार चिनी हाँगकाँगमधून परत चीनला धाडण्यात आले. या दोन्ही वेळी संस्थेला निर्वासितांच्या पाठीशी ठामपणे उभे राहाता आलेले नाही असे टीकाकार म्हणतात.

नोबेल पारितोषिकांच्या मानकऱ्यांच्या नावांबद्दल पाळण्यात येणारी गुप्ततेची परंपराही या पारितोषिकाच्या बाबतीत मोडली गेली. कारण समितीला सुचविण्यात आलेल्या ७७ संभाव्य मानकऱ्यांपैकी काहींची नावे जाहीर झाल्याने गुप्तता संपली. यांपैकी वादग्रस्त ठरू शकल्या असत्या अशा काही व्यक्ती पुढील होत. पोलंडमधील 'सॉलिडॅरिटी' या कामगार संघटनेचे नेते लेश वॉलेसा यांच्या निवडीचा रशियाकडून निश्चितपणे निषेध झाला असता असे काहींना वाटते; जिमी कार्टर (यांना कँप डेव्हिड करारासाठी)– यावर जहाल अरबांनी टीकेची झोड उडविली असती, हे निश्चित. झिंबाब्वेचे प्रंतप्रधान रॉबर्ट मुगाबे व ब्रिटनचे परराष्ट्रमंत्री लॉर्ड कॅरिंग्टन (ऱ्होडेशियातील युद्धसमाप्तीबद्दल संयुक्तपणे)– मुगाबे यांच्यावर अलीकडेच दहशतवादी कृत्ये केल्याचा आरोप करण्यात आलेला आहे आणि अण्वस्त्रांच्या निर्मूलनासाठी दीर्घ काळापासून प्रयत्न करणाऱ्या स्वीडनमधील शांततावादी नेत्या आल्वा मिर्दाल– रशिया व अमेरिका यांच्या शस्त्रास्त्रविषयक धोरणांना ह्या एकाच मापाने मोजनात अशी टीका त्यांच्यावर केली जाते.

अशा प्रकारे मतभेद व टीका होत असतानाच आणि ज्या संस्थेचे कित्येक दाते देश तिच्या व्यवस्थापनाबद्दल शंका उपास्थित करीत असतानाच त्या संस्थेला पारितोषिक मिळाल्याने तिचे कर्मचारी चकित झाले व त्यांना ही बातमी इतकी अनपेक्षित होती की, ती आयुक्तांच्या कानी घालण्यासाठी त्यांना आयुक्तांचा तब्बल दीडतास शोध घ्यावा लागला. बातमी समजली तेव्हा आयुक्त जेवत होते व या बातमीवरील प्रतिक्रिया व्यक्त करताना त्यांनी गेल्या वर्षी केलेलेच एक निवेदन वाचून दाखविले व ते म्हणाले, "निर्वासितांविषयी केवळ ऐकूनच घेतले जाते असे नव्हे, तर आता त्यांना समजूनही घेतले जाऊ लागले आहे, असे या पारितोषिकावरून दिसून येते. आफ्रिका, आशिया व मध्य अमेरिका या भागांत निर्वासितांविषयीचे नवीन प्रश्न उभे राहात असून आंतरराष्ट्रीय समूहांना मदतीची अधिकाधिक गरज भासणार आहे व आपण मानवी एकात्मतेच्या तत्त्वाला साहाय्य केले पाहिजे."

एक कोटी चाळीस लाख निर्वासितांपैकी १ कोटी निर्वासितांना साहाय्य केल्याबद्दल व वाढत्या निर्वासितांना मदत करता यावी म्हणून म्हणजे आपले कार्य वाढविण्यासाठी या संस्थेला हे पारितोषिक मिळाले आहे. त्यामुळे १ कोटी निर्वासित जगविण्याचे कार्य करणाऱ्या कर्मचाऱ्यांना आनंद वाटणे साहजिकच आहे. कारण त्यांना निर्वासितांचे लोंढे थोपविणाऱ्या बहुतेक देशांच्या प्रयत्नांविरुद्धही झगडावे लागते. म्हणूनच हार्टलिंग यांनी म्हटले आहे की, या पारितोषिकाला याहून चांगली दुसरी वेळ मिळू शकली नसती. कारण या पारितोषिकामुळे आता संस्थेला निधी जमविणे अधिक सुलभ होईल. तसेच निर्वासितांविषयीच्या वाढत्या प्रतिकूलतेमुळे हल्ली निधी, सेवाभावी कार्यकर्ते आणि आश्रयदात्या देशांचे सहकार्य हे मिळविण्यासाठी अगदी मेटाकुटीने प्रयत्न करणे भाग पडत असते. शिवाय या संस्थेचा व्याप व खर्चही वाढताच आहे. १९७८ च्या तुलनेने संस्थेचा खर्च १९७९ साली दुप्पट झाला; तर इंडोचायना, अफगाणिस्तान आणि इथिओपिया येथील निर्वासितांमुळे १९८० साली तो पुन्हा दुपटीने वाढला.

या संस्थेला हे पारितोषिक दुसऱ्यांदा मिळत आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर युरोपातील निर्वासितांची व्यवस्था लावण्यासाठी मदत केल्याबद्दल या संस्थेला १९५४ साली हे पारितोषिक प्रथम देण्यात आले होते आणि कदाचित पुढे केव्हा तरी इंटरनॅशनल

रेडक्रॉस कमिटीप्रमाणे तिसऱ्यांदाही हे पारितोषिक या संस्थेला मिळण्याची शक्यता नाकारता येत नाही. कारण निर्वासितांचे लोंढे थांबतील असे वाटण्यासारखी परिस्थिती दिसत नाही. हल्ली इथिओपियाची सीमा ओलांडून निर्वासित येत आहेत, तर दक्षिण चिनी समुद्रात छोट्या व्हिएतनामी बोटींतून कसेतरी ते एकत्रित येत आहेत आणि एल–सॉल्व्हाडोर व अफगाणिस्तान येथील युद्धसदृश स्थितीमुळे निराश्रित झालेले लोक डोंगरकपारींच्या आश्रयाला जात आहेत. ( शिवाय बांगला देशातून अधूनमधून निर्वासितांचा ओघ भारताकडे सुरू होत असतो ). १९६० पासून विविध कारणांमुळे निर्वासित झालेल्यांची संख्या अडीच कोटीवर गेली आहे. अशा निर्वासितांना पुष्कळ वेळा अन्न, आसरा आणि वैद्यकीय मदत मुख्यतः याच संस्थेकडून मिळत असते. म्हणूनच पारितोषिक जाहीर करताना नोबेल समितीने म्हटले होते, " निर्वासितांमुळे राष्ट्राराष्ट्रांत तणाव निर्माण होतात अथवा वाढतात; आणि यामुळेच या संस्थेचे कार्य मानवता व शांतता यांना पोषक असे आहे. "

साहित्याचे पारितोषिक कोणाला मिळणार याविषयी लेखकांमध्ये दरवर्षीच्या ऑक्टोबर महिन्यात तर्कवितर्क लढविले जात असतात. या वर्षीही असेच अंदाज बांधण्यात आले होते आणि हॅरल्ड पिंटर, ऑर्थर मिलर व पीटर वाइस यांच्यापैकी एखाद्याला हा बहुमान लाभेल असा कयास करण्यात आला होता; परंतु गेल्या दोन वर्षांप्रमाणेच याही वर्षी विशेष ख्यातनाम नसलेल्या साहित्यिकाला हे पारितोषिक देण्यात आलेले आहे. एलियास कॅनेटी हे ते साहित्यिक होत. यूरोप व अमेरिकेत जरी ते थोड्यांनाच माहीत असलेले साहित्यिक असले, तरी त्यांच्या कलाकृतींची स्तुतीच झालेली आहे. शिवाय काहींना असेही वाटते की, या पारितोषिकासाठी कॅनेटी यांच्याइतका लायक साहित्यिक शोधूनच काढावा लागला असता.

कॅनेटी यांचा जन्म ( १९०५ ) जरी बल्गेरियातील डॅन्यूब पोर्टसिटी येथे झाला असला तरी त्यांचे वास्तव्य ऑस्ट्रिया, जर्मनी, स्वित्झर्लंड आणि इंग्लंड अशा वेगवेगळ्या देशांत झाले आहे. १९३८ साली ते प्रथम फ्रान्समध्ये आणि १९३९ साली इंग्लंडमध्ये राहू लागले. ते जरी लंडनचे रहिवासी असले, तरी त्यांची भटकंती अजूनही थांबलेली आहे असे नाही. अद्यापही ते पॅरिस, रोम, बर्लीन, दक्षिण आफ्रिका असे भटकत असतात. या संबंधात त्यांनी लिहिले आहे, " खरोखरीच सुंदर असलेल्या शहरात राहात बसणे शक्य होत नाही, ते शहर तुमची सर्व उत्सुकता, उत्कट इच्छा घालवून टाकते. "

त्यांनी रसायनशास्त्रातील डॉक्टरेट पदवी संपादन केली असली आणि ते बहुभाषी असले, तरी त्यांनी प्रयोगशाळेकडे कायमची पाठ फिरविली आहे व केवळ जर्मन भाषेतच साहित्यनिर्मिती करण्याचा निर्णय त्यांनी १९४४ सालीच घेतला. या आपल्या निर्णयाविषयी तेव्हा एकदा ते म्हणाले होते, " मी ज्यूइश आहे व नाझींची बाँबफेकी विमाने लंडनवर घिरट्या घालीत असतात. या सर्व संहारातून जर माझे नाव मागे राहिलेच, तर ते ( प्रसिद्ध जर्मन कवी ) गटे यांचेच ऋण म्हणावे लागेल. "

कादंबरी, नाटक, प्रवासवर्णन, आठवणी असे विविध साहित्यप्रकार त्यांनी हाताळले आहेत. त्यांचे लेखन आधुनिक दृष्टीने पाहाता गूढ प्रकारचे आहे आणि म्हणून टॉमस मान यांनी त्यांना 'काफ्काचा पुत्र' व 'आयनेस्कोचा पिता' असे संबोधिले आहे. त्यांना कोणत्याच राजकीय प्रणालीत स्वारस्य नसल्याने ते सर्व गोष्टींकडे अलिप्तपणे वा तटस्थपणे पाहू शकतात. त्यांनी पुष्कळ पुस्तके लिहिली असली, तरी सातांचेच इंग्रजीत अनुवाद झालेले आहेत. त्यांच्या बहुतेक साहित्यकृतींचे मुख्य सूत्र देशत्यागासंबंधीचे असलेले आढळते आणि वैयक्तिक स्वभाववैचित्र्यानुसार केलेली निरीक्षणेच त्यांत येताना दिसतात. या संबंधात त्यांनी लिहिले आहे. " सर्व जगाच्या असमाधानाची वेदना एका माणसातही आढळते आणि जोपर्यंत आपण असमाधानाचा त्याग करू शकत नाही तोपर्यंत काहीच त्याज्य ठरत नाही. " तसेच 'द व्हॉइसेस ऑफ माराकेश,' 'ए रेकॉर्ड ऑफ ए व्हिजिट' या पुस्तकांविषयी त्यांनी लिहिले आहे, " मला माहीत असलेल्या माणसांचे यथातथ्य आकलन करून घेण्यात मला स्वारस्य नाही ( तर ) त्यांची अचूकपणे अतिशयोक्ती करण्यात मला रस आहे." हा तन्हेवाईकपणा हा त्यांच्या शैलीचाच भाग बनला असून एक टीकाकार त्यांच्याविषयी लिहि-

अनुक्रमणिका

तात," समर्थनासाठी आपली प्रतिभा राबविणे हे काही त्यांचे काम नाही; पण या काळाचा साक्षीदार म्हणून सर्वात महान, सर्वात भव्य अशा आशाभंगाचे ( निराशेचे ) मानदंड प्रस्थापिणे हे (त्यांचे कार्य) आहे."

'ऑतो-दा-फे ( १९३५, म्हणजे पाखंडी माणसाला करण्यात आलेली जाळून मारण्याची शिक्षा) ही कादंबरी आणि 'क्राउड्स अँड पॉवर' (१९६०) ही त्यांची विशेष गाजलेली पुस्तके असून काही काळ ती मध्य युरोपात सर्वाधिक खपाची पुस्तके ठरली होती. मात्र इतरत्र त्यांना मोठ्या प्रमाणावर वाचकवर्ग लाभला नाही. या कादंबरीच्या विषयाने त्यांना चाळीस वर्षे झपाटले होते. या कादंबरीचा नायक हा चीनविषयक शास्त्राचा प्राध्यापक असून आपल्या २५ हजार ग्रंथांबाहेरचे जग त्याच्या खिजगणतीतच नसते. मात्र जेव्हा तो प्रौढ मोलकरणीशी लग्न करतो तेव्हा त्याच्या भावविश्वात प्रचंड खळबळ उडते आणि तो वेश्या, भिकारी व चोर यांच्या दुनियेत फेकला जातो. यामुळे पौर्वात्य विचारांवरील ग्रंथ पुरा करण्याचे त्याचे स्वप्न हा वेडेपणा ठरतो. शेवटी जरी तो परत आपल्या ग्रंथसंग्रहाच्या सहवासात येतो, तरी तो त्याला आग लावून देतो आणि स्वतःला त्या आगीत झोकून देतो.

इंग्लंडमध्ये आल्यावर त्यांना दुसऱ्या महायुद्धाच्या भयानकतेचे दर्शन झाले; त्यामुळे ते २५ वर्षे अस्वस्थ झालेले होते. त्यातूनच 'क्राउड्स अँड पॉवर' या पुस्तकाचा जन्म झाला आहे. हे पुस्तक म्हणजे संहारानंतर येणाऱ्या विषण्णतेची केलेली एकप्रकारची चिरफाडच आहे. 'द टंग सेट फ्री' हे त्यांच्या आठवणींचे पुस्तक असून त्याच्यात त्यांनी डॅन्यूब नदीवरील रुशक या बंदराच्या गावी गेलेल्या आपल्या बालपणाचे सुंदर वर्णन केले आहे.

हे पारितोषिक जाहीर झाले तेव्हा त्यांनी आपला अलिप्तपणा सोडला नाही. त्यावेळी ते बव्हेरियातील एका गावी विश्रांतीसाठी गेले होते आणि त्यांनी पारितोषिकांच्या संदर्भातील सर्व मुलाखतींना नकार दिला होता. ते स्वतःतच गुंतून पडणारे आहेत, असा त्यांचा लंडनचा प्रतिनिधी म्हणतो. तेही म्हणाले होते, "ढोंगांच्या वेगवान वारूवर स्वार होण्यास मी कंटाळलो आहे; मी अजून मनुष्यप्राणीही (बनू शकलो) नाही."

या वर्षीचे अर्थशास्त्राचे नोबेल पारितोषिक जेम्स टोबीन या प्रसिद्ध अमेरिकन अर्थशास्त्रज्ञांना मिळाले आहे. १९१८ साली जन्मलेले टोबीन सध्या येल विद्यापीठात अर्थशास्त्राचे प्राध्यापक आहेत. ते नवकेन्सवादी आर्थिक सिद्धांतांचे प्रमुख शिल्पकार मानले जातात. अर्थशास्त्रीय क्षेत्रामध्ये त्यांच्या ज्ञानाविषयी आदरयुक्त दरारा असलेला आढळतो. वीस वर्षांपूर्वी ते जॉन एफ्. केनेडी व लिंडन बी. जॉन्सन या अमेरिकेच्या अध्यक्षांचे आर्थिक सल्लागार होते. आर्थिक कृतिशीलतेचा वापर समाजाचे कल्याण साधण्यासाठी झाला पाहिजे असा त्यांचा आग्रह असून त्याचा ते हिरिरीने प्रचार करतात. अध्यक्ष रीगन यांच्या नवीन आर्थिक धोरणाच्या काळात टोबीन यांच्या कार्याचे राजकीय मूल्य अल्पसेच असणार, हे उघड आहे. तथापि या वर्षीचे अर्थशास्त्राचे नोबेल पारितोषिक त्यांना मिळाल्याने रीगन यांच्या आर्थिक धोरणावर सुरू झालेल्या चर्चेला धार चढली आहे.

टोबीन हे एक अष्टपैलू असे अर्थशास्त्रज्ञ आहेत आणि म्हणूनच त्यांच्या एखाद्या सिद्धांताऐवजी त्यांनी गेल्या ३५ वर्षात केलेल्या अर्थशास्त्राविषयीच्या एकूण संशोधनासाठीच त्यांना नोबेल पारितोषिक देण्यात आलेले आहे. चलन-महसूलविषयक धोरण आणि खरीखुरी जागतिक गुंतवणूक व आर्थिक घडामोडी यांच्यामध्ये होणाऱ्या परस्परक्रिया कशा होतात, हे शोधून काढण्यावरच मुख्यत्वे त्यांनी लक्ष केंद्रित केले आहे. एके काळी ते स्वतःला 'हस्तीदंती मनोऱ्यातील' किंवा रूढ आर्थिक कल्पनांपासून फटकून वागणारे अर्थशास्त्रज्ञ मानीत असत, मात्र असे असले, तरी संस्था किंवा व्यक्ती यांचे प्रत्यक्ष वर्तन आणि अमूर्त साकलिक अर्थशास्त्र ( एकूण देशाची प्राप्ती व गुंतवणूक यांच्यातील संबंधांसारख्या व्यापक व सर्वसाधारण बाबींशी निगडित असलेली अर्थशास्त्राची शाखा ) यांच्यात संपर्क प्रस्थापित व्हावा, असाच प्रयत्न त्यांनी नेहमी केला आहे. समाजाची आर्थिक स्थिती अधिक चांगली होण्यासाठी अर्थशास्त्राचे वर्तन कसे झाले पाहिजे, हे समजून घेणे ही

त्यांच्या संशोधनामागील मूळची प्रेरणा आहे, असे विल्यम ब्रेनार्ड या येल विद्यापीठातील अधिकारी व्यक्तीचे मत आहे. त्यांच्या खाजगी आयुष्यावरही मानवतावादी विचारसरणीचा पगडा आहे, असे त्यांच्या सहकाऱ्यांना वाटते. येल विद्यापीठातील पदवीधर अर्थशास्त्र विभागाचे प्रमुख विल्यम पार्कर म्हणतात, "टोबीन यांना नागरिकाची कर्तव्ये व गुण यांची खरीखुरी जाण असल्याने ते एक प्रकारे जणू जुने 'रोमन नागरिक' असावेत असे वाटते."

पोर्टफोलिओ सिलेक्शन थिअरी (विभागशः–ताळेबंद–निवड सिद्धांत) हे त्यांचे सर्वाधिक माहीत झालेले आणि नोबेल समितीने सर्वांत महत्त्वाचे म्हटलेले, असे कार्य आहे. गुंतवणुकीतून होणाऱ्या लाभामागील जोखमीचा अंदाज करून व्यक्ती वा संस्था आपापली गुंतवणूक व कर्ज यांच्यात कसा समतोल साधतात, हे या सिद्धांतात स्पष्ट केले आहे. टोबीन अतिशय साधेसुधे गृहस्थ असून ते या सिद्धांताचे सुटसुटीत व कळेल असे उदाहरण देतात; ते म्हणतात, हा सिद्धांत म्हणजे "सर्वच अंडी एका टोपलीत न ठेवण्याच्या तत्त्वासारखा" आहे.

अध्यक्ष केनेडी यांचे आर्थिक सल्लागार असताना त्यांनी खाजगी गुंतवणुकीस उत्तेजन देण्याच्या हेतूने 'गुंतवणूक-कर-पत' या योजनेस मदत केली होती. १९७३ सालच्या अर्थशास्त्राच्या नोबेल पारितोषिकाचे मानकरी वासिली लेओनटिएफ म्हणतात, "नव-केन्स आर्थिक सिद्धांतामधील सर्वोत्कृष्ट भाग म्हणजे टोबीन यांचे कार्य होय." हल्ली अमेरिकेत केन्सप्रणीत अर्थशास्त्रीय विचारांच्या विरोधी लाट आलेली असून तिला टोबीन यांचा विरोध आहे, हे उघडच आहे. तथापि पारितोषिकाची घोषणा झाली त्याच दिवशी त्यांनी रीगन–प्रशासनावर हल्ला चढविण्यास सौजन्यापोटी नकार दिला होता. मात्र नंतर त्यांनी यासंबंधात पुढील इशारा दिला. अध्यक्ष रीगन यांनी सुचविलेल्या प्रचंड करकपातीमुळे "मंदीवर मात न केली जाता गरीब व श्रीमंत यांच्या जीवनमानात असलेली दरी रुंदावतच जाईल."

नोबेल पारितोषिकामुळे त्यांच्या प्राध्यापकी दिनक्रमात बदल होईलसे दिसत नाही. कारण पारितोषिक जाहीर होण्याच्या आधी एकतास ते पदवीपूर्व विद्यार्थ्यांबरोबर भोजन घेत होते आणि अध्यापनाविषयी त्यांना आत्मीयता व आदरच वाटतो. पोर्टफोलिओ सिलेक्सन सिद्धांताचा हा जनक जोखमीशी समतोल राखून या पारितोषिकापोटी मिळालेले १.८ लक्ष डॉलर कसे गुंतविणार आहे? अर्थातच या गुंतवणुकीची सुरुवात त्यांच्या पत्नी बेटी यांच्याकडून होणे साहजिक आहे. कारण जेम्ससाठी नवीन सायकल खरीदण्याची आणि त्यालाच 'वर्ल्ड सीरीज' हा कार्यक्रम पाहाता यावा म्हणून एक दूर चित्रवाणी संच भाड्याने आणण्याची बेटी यांची योजना आहे.

मानवी मनाचा नकाशा काढता येणे शक्य आहे का? अशी शक्यता आहे. आणि या वर्षी ती सूचित करणाचा तिघा शास्त्रज्ञांना वैद्यकाचे (अथवा शरीरक्रियाविज्ञाचे) नोबेल पारितोषिक देण्यात आले आहे. मानवाचा मेंदू हे स्वतंत्र असे विश्वच आहे, असे म्हटले जाते. मेंदू अनेक प्रकारच्या प्रश्नांविषयी विचार करू शकतो. मेंदू निश्चित कसा काम करीत असतो? हा त्यांपैकी सर्वात गहन असा प्रश्न आहे आणि या प्रश्नाविषयीच सर्वाधिक कुतूहल असल्याचे आढळते. माणसाची जाणीव आणि समज हे समजावून घेण्याचे मार्ग अतिशय गुंतागुंतीचे आहेत आणि या मार्गांच्या मदतीनेच मेंदूविषयी असलेल्या काही प्रश्नांची उकल करण्याचे प्रयत्न या तिघांनी केले आहेत. त्यामुळेच तिघांना नोबेल पारितोषिक मिळाले आहे. पैकी रॉजर वॉलकॉट स्पेरी (६८) यांना पारितोषिकाची अर्धी रक्कम देण्यात आली, तर डेव्हिड ह्यूबेल (५५) व टॉर्सस्टेन वीझेल (५७) या दोघांना उरलेल्या निम्म्या रकमेमध्ये समान वाटा मिळाला आहे.

स्पेरी हे कॅलिफोर्निया इन्स्टिटट्यूट ऑफ टेक्नॉलॉजीमध्ये प्राध्यापक असून त्यांना अनेक बहुमान यापूर्वी मिळालेले आहेत. मेंदूच्या दोन प्रमस्तिष्क गोलार्धांच्या वेगवेगळ्या कार्यांच्या संदर्भात मूलभूत संशोधन करून ती समजूत घेतल्याबद्दल हे पारितोषिक त्यांना मिळाले आहे. त्यांचे मेंदूविषयीचे संशोधन गेली ३० वर्षे चालू आहे. मिळालेल्या माहितीवर मेंदू पुढे कशा प्रकारे प्रक्रिया करतो, यासंबंधीच्या आधुनिक संशोधनाचा सैद्धांतिक पाया

अनुक्रमणिका

स्पेरी यांच्या संशोधनाने घातला गेला आहे. मेंदूच्या दोन गोलार्धांपैकी एक प्रमुख असून दुसरा गौण ( म्हणजे उच्च दर्जाचे मानसिक कार्य करण्यास असमर्थ असलेला ) असतो, असे एके काळी मानले जात असे. उदाहरणार्थ, प्रसिद्ध रशियन मानसशास्त्रज्ञ इव्हान पावलॉव्ह यांचे असे मत होते की, विचारवंतांचा डावा तर कलावंतांचा उजवा मेंदू ( प्रमस्तिष्क गोलार्ध ) अधिक प्रभावी असतो. हे तपासून पाहाण्यासाठी स्पेरी यांनी प्राण्यांवर प्रयोग करून पाहिले. या प्रयोगांमध्ये त्यांनी मेंदूच्या दोन्ही गोलार्धांना जोडणारे असंख्य मज्जातंतू शस्त्रक्रियेने अलग केले. असे असले, तरी एकच गोलार्ध उत्तेजित केल्यास प्राणी एकदा जे काही शिकला आहे ते कार्य करू शकतो, हे त्यांना आढळून आले. तसेच दुसऱ्या गोलार्धाला स्वतंत्रपणे अशी कार्ये शिकविता येतात, असेही दिसून आले.

अपस्माराच्या ज्या रुग्णांवर झटक्यांचे नियंत्रण करता यावे म्हणून अशाच तऱ्हेची शस्त्रक्रिया करण्यात आली होती, अशा रुग्णांचा स्पेरी यांनी नंतर अभ्यास केला. वरवर पाहाता अशा रुग्णांच्या मानसिक कार्यक्षमतेत बदल झाला नाही, असे त्यांना आढळले. अशा रुग्णांमध्ये मेंदूच्या प्रत्येक गोलार्धाचे जाणिवेचे, अनुभवाच्या आकलनाचे, भावनांचे, विचारांचे आणि स्मृतीचे जग स्वतंत्र असते, असेही त्यांनी घेतलेल्या चाचण्यांमध्ये कळून आले. मेंदूचा उजवा गोलार्ध डाव्याच्या मानाने कनिष्ठ दर्जाचा असतो, असा पूर्वी समज होता; परंतु स्पेरी यांच्या नंतरच्या संशोधनाने उजवा गोलार्ध काही बाबतींत डाव्याच्या मानाने श्रेष्ठ असल्याचे लक्षात आले. उदाहरणार्थ, स्पष्टपणे विचार करण्याची क्षमता, श्रवणाद्वारे मनावर उमटलेल्या ठशाचा अर्थ लावणे, दिशांच्या बाबतीतील गुंतागुंतीच्या संबंधांचे आकलन, संगीताचा आस्वाद घेणे, ताल, लय यांतील सूक्ष्मभेद ओळखणे वगैरे. उलट अमूर्त विचार करणे, घटनांचे तर्कशुद्ध विश्लेषण करणे, बोलणे, लिहिणे, हिशोब करणे इत्यादी कामे डाव्या मेंदूला अधिक चांगली जमतात, असे स्पेरी यांचे मत आहे.

ह्यूबेल व वीझेल हे दोघे हार्व्हर्ड मेडिकल स्कूल येथे मेंदूविषयक शास्त्राचे प्राध्यापक आहेत. प्रतिमा डोळ्याच्या पडद्याकडून मेंदूकडे कशी पाठविली जाते, हे शोधून काढल्याबद्दल या दोघांना नोबेल पारितोषिक मिळाले आहे. या संशोधनामुळे मेंदूच्या जगातील छोट्याशा भागातील रस्त्यांचा जणू नकाशाच इतरांना उपलब्ध होऊ शकला. मेंदूच्या ज्या बाहेरील भागात दिसण्याविषयीच्या संवेदनांचा अर्थ लावला जातो, त्याला दृक्‌वाह्यक म्हणतात. या बाह्यकातील मज्जापेशींनी टाकलेले विद्युतीय आवेग या दोघांनी मोजले. तेव्हा या बाह्यकातील पेशी स्तंभरूपात नियमितपणे रचलेल्या असून हे स्तंभ तितक्याच नियमितपणे संघटित झाले असल्याचे त्यांना दिसून आले. तसेच प्रत्येक स्तंभातील प्रत्येक पेशीकडे विशिष्ट कार्य करण्याची जबाबदारी असल्याचेही त्यांना आढळले. भेद, रेखीय आकृतिबंध व डोळ्याच्या पडद्यावरील हालचाल यांच्यानुसार येणाऱ्या प्रतिमांचे ज्ञान वा माहिती करून घेणे व त्याचे विश्लेषण वा पृथक्करण करणे ही ती कार्ये होत. हे विश्लेषण एका ठराविक क्रमाने होत असते. शेवटी ही सर्व माहिती मेंदूच्या उच्च केंद्राकडे पाठविली जाते व तेथे 'पूर्ण चित्र' म्हणजे दृश्य प्रतिमा एकत्रित जोडली जाऊन तिची स्मरणात नोंद केली जाते.

अशा प्रकारे या तिघांच्या संशोधनामुळे मेंदूसंबंधीच्या रूढ असलेल्या समजुतींना धक्के बसले असून त्यामुळे नवीन संशोधनास चालना मिळेल आणि या तिघांचे संशोधन व त्यांनी वापरलेली तंत्रे ही नव्या संशोधनाचा आधार ठरतील. जन्मजात दोष, लेखन-वाचन शिकण्यात उद्‌भवणाऱ्या अडचणी यांसारख्या गोष्टींवर मात करणे या संशोधनामुळे शक्य होईल; तसेच मेंदूच्या काही विकृतींचा उलगडा होण्यासही त्याची मदत होऊ शकेल. आपण आहोत तसे का आहोत ? आपण अनेक प्रकारच्या गोष्टी का करीत असतो ? वगैरे प्रश्नांची उत्तरे मिळण्यासही हे संशोधन साहाय्यभूत ठरू शकेल. लहान मुलांच्या आकलनशक्तीत व संवेदनशीलतेमध्ये जो फरक आढळतो, त्याविषयी उलगडा होण्याची शक्यता या संशोधनाने वाढली आहे. म्हणूनच नोबेल समिती या तिघांनी केलेल्या संशोधनाबद्दल म्हणते, "आतापर्यंत जवळ जवळ पूर्णपणे अज्ञात असलेली मेंदूच्या अंतरंगाविषयीची सूक्ष्मदृष्टी तिघांच्या संशोधनामुळे आपल्याला लाभली आहे." तथापि अजूनही मेंदूचे कार्य व मन हे एक

अनुक्रमणिका

गूढच आहे. मात्र ह्यूबेल यांना हे कोडे उलगडले जाण्याची खात्री वाटते. ते म्हणतात, "आता आपण मनाविषयी वेगळ्या तऱ्हेने विचार करू शकतो. मन ही काही गूढ गोष्ट राहिली नाही, तर ती जाणून घेता येईल अशी बाब बनली आहे."

या वर्षीच्या भौतिकीच्या आणि रसायनशास्त्राच्या नोबेल पारितोषिकांच्या बाबतीत काहीशी मजेशीर गोष्ट आढळून येते. ज्या दोघांना रसायनशास्त्राचे पारितोषिक मिळाले आहे, त्यांनी आधुनिक भौतिकीचा आधारस्तंभ मानल्या गेलेल्या पुंजयामिकीचा वापर रेणू कसे तयार होतात, हे जाणून घेण्यासाठी केला आहे. उलट ज्या तिघांना भौतिकीचे पारितोषिक मिळाले आहे, त्यांनी प्रदूषण निर्मिणारे पदार्थ, गंज यांच्यासारख्या गुंतागुंतीच्या मिश्रणासंबंधीच्या रासायनिक खुणा कशा ओळखाव्यात हे शोधून काढले आहे. यांवरून भौतिकी व रसायनशास्त्र ही दोन्ही विज्ञाने अणूपलीकडील क्षेत्रात एकमेकांमध्ये कशी मिसळून गेली आहेत, हेच स्पष्ट होते.

दगड किंवा धातूचा तुकडा या निर्जीव वस्तू नुसत्या डोळ्यांनी पाहिल्यास पूर्णतया जीवनहीन म्हणजे निश्चेष्ट दिसतात; परंतु सर्वांत निश्चेष्ट वाटणाऱ्या या वस्तूंमध्ये शास्त्रज्ञांना विविध प्रकारच्या हालचाली दिसून येतात. कारण अशा वस्तूंमधील अणुरेणू अविरतपणे हालचाल करीत असतात. ते जोराने आंदोळतात, शेजाऱ्यांवर धाडकन आदळतात आणि प्रत्येक दिशेत झोकांड्या खाल्ल्याप्रमाणे होणारे एक प्रकाराचे नृत्य करीत असतात. मानवाच्या नेहमीच्या जाणिवांना न जाणवणारा हा 'गोंधळ' सत्यस्थिती जाणून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. अणूंचा हा उन्मत्त नाच पाहण्याचे मार्ग खुले करण्याच्या दृष्टीने प्रयत्न केल्याबद्दल या वर्षीची रसायनशास्त्र व भौतिकी या विषयांची नोबेल पारितोषिके देण्यात आली आहेत. या पारितोषिक विजेत्या पाचजणांपैकी ३ अमेरिकेचे, एक जपानचा आणि एक स्वीडनचा शास्त्रज्ञ आहे. विसाव्या शतकामध्ये शास्त्रज्ञांच्या हाती आलेले एक अधिक गूढ असे साधन त्यांनी आपल्या संशोधनात वापरले आहे. पुंजयामिकी हेच ते साधन होय. द्रव्याचे सर्वांत लहान घटक कधी तरंगासारखे तर कधी कणांप्रमाणे वागत असतात. द्रव्याच्या या विरोधाभासात्मक दोन स्वरूपांकडे पाहाण्याचा गणितीय दृष्टिकोन म्हणजे पुंजयामिकी होय. मात्र या शास्त्रज्ञांनी जे निष्कर्ष काढले आहेत, ते केवळ सैद्धांतिक चर्चेतच उपयुक्त नाहीत, तर ते मानवाच्या रोजच्या व्यवहारातही उपयुक्त ठरू शकतील, उदाहरणार्थ, प्रदूषणाचे मापन करणारे तंत्रज्ञान विकसित करणे, नवी औषधे, रसायने निर्मिणे इत्यादींसाठी हे निष्कर्ष उपयुक्त ठरू शकतील.

या वर्षी भौतिकीसाठी तिघांना देण्यात आलेले नोबेल पारितोषिक हे वर्णपटविज्ञानातील संशोधनासाठी देण्यात आलेले आहे. न्यूटन यांनी जेव्हा प्रकाशाची शलाका लोलकातून पाठवून त्याचे इंद्रधनुष्यातील सप्तरंगांमध्ये पृथक्करण केले, त्या क्षणापासून वर्णपटाचा उपयोग सुरू झाला. आता वर्णपटविज्ञान हे अणुरेणूंच्या अभ्यासाचे एक मोलाचे साधन झाले आहे. कोणताही पदार्थ शुभ्र प्रकाश बाहेर टाकण्याइतका तापविला, तर त्याच्यापासून वर्णपट मिळतो; आणि हा वर्णपट इतका वैशिष्ट्यपूर्ण असतो की, ज्याप्रमाणे बोटांच्या ठशांवरून व्यक्तीची ओळख पटते त्याप्रमाणे या वर्णपटाच्या साह्याने तो पदार्थ ओळखता येतो. अशा प्रकारे दूरवरच्या ताऱ्यांच्या वर्णपटांवरून त्यांचे संघटन, वय, तापमान, स्वरूप, गती वगैरेंसारखी माहिती मिळविणे शक्य झाले.

प्रकाशाचा स्रोत, क्ष-किरण अथवा गॅमा किरण वस्तूवर टाकून वर्णपट मिळविता येतो. जेव्हा किरणांची ऊर्जा अणूवर पडते तेव्हा त्याच्यातील इलेक्ट्रॉन एका ऊर्जास्तरातून दुसऱ्यात उडी घेतात. हे होत असताना ठराविक कंप्रतेचा प्रकाश बाहेर टाकला जातो अथवा शोषला जातो आणि अशा तऱ्हेने मिळालेल्या वर्णपटांच्या साहाय्याने आणवीय व रेणवीय संरचनेविषयी महत्त्वाची माहिती मिळते. १९४० च्या सुमारास मात्र वर्णपटविज्ञानाच्या या परंपरागत पद्धतींच्या मर्यादा लक्षात आल्या. अणूच्या अंतरंगातील गुपिते हुडकून काढण्याच्या दृष्टीने नेहमीचा प्रकाश हा तेथपर्यंत शिरू शकण्याइतपत शक्तिमान वा अचूक नसल्याचे दिसून आले. या अडचणींवर मात करण्यासाठी नव्या दिशेने प्रयत्न

अनुक्रमणिका

करण्यात आले त्यांतूनच आणवीय प्रणालींच्या अध्ययनासाठी लेसर शलाका आणि इलेक्ट्रॉनीय उपकरणे वापरण्याच्या सुधारलेल्या पद्धतींचा विकास होत गेला ( लेसर ही अरुंद, तीव्र व एकाच कंप्रतेची सलग अशी प्रकाशशलाका असते. कवायत करताना ज्याप्रमाणे एकाची पावले दुसऱ्याच्या पावलांसारखी पडतात. त्याचप्रमाणे लेसरमधील प्रत्येक तरंग हा पुढच्या तरंगाप्रमाणे जात असतो. )

या पद्धतींच्या विकासासाठीच या वर्षीचे भौतिकीचे नोबेल पारितोषिक तिघांना देण्यात आले आहे. पैकी निम्मे पारितोषिक काई सीग्बान ( ६३ ) यांना तर उरलेले अर्धे आर्थर श्व्हॅलो ( ६० ) आणि नीकोलास ब्लूमबर्गेन यांच्यात सारखे विभागले गेले आहे. याबाबतीत सीग्बान यांचे वैशिष्टच असे की, त्यांचे वडील कार्ल मान्ने येऑन्य सीग्बान यांनाही १९२४ साली भौतिकीचे नोबेल पारितोषिक मिळाले होते. अर्थात यापूर्वीही असे अनेकदा घडले आहे. उदाहरणार्थ, प्येअर क्यूरी व मारी क्यूरी या दांपत्याला १९०३ सालचे भौतिकीचे (शिवाय मारी क्यूरी यांना १९११ साली रसायनशास्त्राचेही) नोबेल पारितोषिक मिळाले होते. आणि त्यांची कन्या ईरेन झॉल्यो-क्यूरी व जामात झां फ्रेदेरिक झॉल्यो या दांपत्याला १९३५ सालचे रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक मिळाले होते; आणि विशेष म्हणजे चौघांचे संशोधन हे किरणोत्सर्ग व किरणोत्सर्गी मूलद्रव्ये यांसंबंधींचे होते. असेच दुसरे उदाहरण बोर पितापुत्रांचे होय. नील हेन्रिक डेव्हिड बोर यांना १९२२ साली भौतिकीचे आणि त्यांचा मुलगा ऑगे नीलस बोर याला १९७५ साली भौतिकीचेच नोबेल पारितोषिक मिळाले आहे. मात्र काई सीग्बान यांचे आणखी एक वैशिष्टय म्हणजे त्यांच्या वडिलांना क्ष-किरण वर्णपटविज्ञानातील ज्या संशोधनासाठी हे पारितोषिक मिळाले होते तेच संशोधन मुलाच्या पारितोषिकपात्र संशोधनाचा पाया ठरले आहे. म्हणजे वडिलांचे संशोधन पुढे चालू ठेवून मुलाने नोबेल पारितोषिक मिळविले आहे म्हणूनच काई सीग्बान म्हणतात, "जर तुम्ही रोज न्याहारी करताना भौतिकीची चर्चा केली, तर तिचा निश्चितच फायदा होतो."

काई सीग्बान हे १९५० सालापासून अप्साला विद्यापीठात भौतिकीचे प्राध्यापक असून ते स्वीडनचे गेल्या दशकामधील अग्रगण्य असे भौतिकीविज्ञ आहेत. त्यांनी १९५०-६० दरम्यानच्या काळात इलेक्ट्रॉन वर्णपटविज्ञानाचा विकास घडवून आणला. जेव्हा जंबुपार अथवा क्ष-किरण अणूवर पडतात तेव्हा इलेक्ट्रॉन मुक्त होतात, हे पुष्कळ पूर्वीपासून माहीत होते. मात्र आपल्या नेहमीच्या ऊर्जास्तरातून बाहेर पडताना इलेक्ट्रॉन इतर इलेक्ट्रॉनांवर आदळतात आणि त्यामुळे अगदी अस्पष्ट असे वर्णपट निर्माण होतात. सीग्बान यांनी शोधून काढलेल्या केंद्रीभवनाच्या युक्तीमुळे असे इलेक्ट्रॉनांनी मागे ठेवलेले मार्ग (वर्णपट) पाहता येणे शक्य झाले आहे. या तंत्रामुळे अज्ञात नमुन्याच्या रासायनिक संरचनेविषयी अनुमान करता येऊ लागले असून हे तंत्र इतके संवेदनशील आहे की, त्याद्वारे एखाच्या धातुपृष्ठावरील अणूच्या व्यासाच्या एकशतांश इतक्या अल्पजाडीचा गंजाचा थरही ओळखता येऊ शकतो आणि गंजरोधक क्रिया योग्य वेळीच करणे शक्य होते.

आर्थर श्व्हॅलो ( स्टॅनफर्ड विद्यापीठ ) व नीकोलास ब्लूमबर्गेन ( हार्व्हर्ड विद्यापीठ ) या दोघांनी शब्दशः द्रव्याच्या अगदी आतल्या गुपितांवर प्रकाश टाकला आहे आणि त्यासाठी त्यांनी शक्तिमान प्रकाशशलाकांचा वापर केला आहे. तीक्ष्ण, शुद्ध लेसर शलाकेच्या साहाय्याने अणू उत्तेजित करून त्यांनी लेसर वर्णपटविज्ञान या विज्ञानाच्या नवीन शाखेत मूलभूत महत्त्वाचे कार्य केले आहे.

श्व्हॅलो हे लेसरचे एक शोधक आहेत. बेल लॅबोरेटरीत असताना त्यांनी आपले मेव्हणे ( बहिणीचे यजमान ) चार्ल्स टाउन्स ( यांनाही १९६४ सालचे भौतिकीचे नोबेल पारितोषिक मिळाले होते ) यांना लेसर बनविण्यास आवश्यक असा एक मार्ग विशद करून साहाय्य केले होते. श्व्हॅलो यांचे सर्वात लक्षणीय कार्य म्हणजे त्यांनी हायड्रोजन या सर्वात साध्या मूलद्रव्याचे अतिशय अचूकपणे अध्ययन केले आहे, हे होय. पारितोषिकाची घोषणा झाल्यावर ते उद्गारले, "मला अजून अकादमीकडून तसे काही समजले नाही; परंतु ही अफवा नाही असे मी धरून चालतो." आणि ही अफवा नसल्याचे लगेचच दिसून आले. त्यांना पारितोषिक मिळाल्याची बातमी भल्या पहाटे झोपेतून उठवून


अनुक्रमणिका

सांगण्यात आली. तेव्हा ते म्हणाले, " अशा प्रकारची ( आनंदाची ) बातमी ऐकण्यासाठी माझी झोपमोड करण्यात आल्याने मी खूष आहे. "

ब्लूमबर्गेन यांचा जन्म नेदर्लंडमध्ये झाला आणि १९२८ आणि ते अमेरिकेचे नागरिक बनले. १९५७ सालापासून ते हार्व्हर्ड विद्यापीठात भौतिकीचे प्राध्यापक आहेत. द्रव्याचे गुणधर्म अभ्यासण्याठी ते १९६१ पासून इतरांनी विकसित केलेल्या विविध प्रकारच्या लेसरांचा वापर करीत आहेत. लेसर शलाकेत अति-उच्च अशी दृश्य प्रकाशाची तीव्रता मिळते आणि या तीव्रतेला नेहमीचे प्रकाशकीचे नियम जसेच्या तसे लागू पडत नाहीत. असे बरेच सुधारलेले नवीन नियम ब्लूमबर्गेन यांनी सूत्रबद्ध केले असून काही प्रस्थापितही केले आहेत. याशिवाय त्यांनी लेसरशी निगडित असलेल्या वर्णपटविज्ञानाच्या माहितीत मोलाची भर टाकली आहे. याकरिता त्यांनी तीन लेसर शलाकांचे मिश्रण करून वैशिष्टयपूर्ण असा चवथा प्रकार निर्माण केला आहे. या शलाकेतून अवरक्त व जंबुपार लेसर प्रकाश निर्माण होतो. या प्रकाशाच्या साहाय्याने शास्त्रज्ञांना ज्वलनकोठीत वायूंचा स्फोट कसा होतो येथपासून ते सजीवाच्या ऊतकातील रेणूंची हालचाल कशी होत असते येथपर्यंतच्या सर्व गोष्टींचे समन्वेषण करणे शक्य झाले आहे.

अशा तऱ्हेने या तिघांच्या संशोधनामुळे पुढील संशोधनाला नवाच आधार प्राप्त झाला असून भावी संशोधनाची दिशा दाखविली गेली आहे. त्यामुळे भावी नोबेल पारितोषिकांचे भाकित करता येऊ शकेल. शिवाय या संशोधनामुळे सजीवाकडे अणूच्या पातळीवरून पाहण्याची सोय उपलब्ध झाली आहे व परिणामी जीवविज्ञान हे अणू व इलेक्ट्रॉन यांच्या क्षेत्राच्या जवळ जाऊ लागले आहे.

जपानच्या क्योटो विद्यापीठातील केनिची फुकुई (६३) आणि अमेरिकेच्या कॉर्नेल विद्यापीठातील रोआल्ड होफमान (४४) यांना या वर्षीचे रसायन शास्त्राचे नोबेल पारितोषिक मिळाले आहे. रासायनिक विक्रियांच्या मार्गाविषयीचे सिद्धांत या दोघांनी स्वतंत्रपणे विकसित केल्याबद्दल त्यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे. अणू व रेणू यांच्यामधील विक्रिया का बरे घडू शकतात अथवा घडू शकत नाहीत, हे ठरविण्याविषयी त्यांनी संशोधन केले असून जगाच्या दोन टोकांवर राहून केलेल्या संशोधनाद्वारे दोघे सारख्याच निष्कर्षाप्रत येऊन पोचले. दोघांचे संशोधन हे अणूच्या अद्ययावत स्वरूपावर आधारलेले आहे. पूर्वी अणूचे स्वरूप सूर्यकुलासारखे मानले जाई. म्हणजे सूर्याप्रमाणे मध्यभागी अणूचे केंद्र आणि त्याभोवती वेगवेगळ्या वर्तुळाकार कक्षांमधून ग्रहांप्रमाणे फिरणारे इलेक्ट्रॉन असे अणूचे स्वरूप गृहीत धरले जाई. मूलकणाकडे तरंग म्हणूनही पाहाण्याच्या पुंजयामिकीच्या दृष्टीमुळे अणूचे स्वरूप पूर्णतया वेगळ्या प्रकारे रेखाटले जाऊ लागले ते असे : अणुकेंद्राभोवती इलेक्ट्रॉनांचा पुंज असून त्याचा आकार डंबेलसारखा असतो. याबाबतीत अनेक शक्यता पुढे मांडण्यात आल्या असून फुकुई यांची शक्यता पुढीलप्रमाणे आहे : रासायनिक विक्रियांच्या बाबतीत सर्वांत बाहेरील पुंज महत्त्वाचा आहे. हा सीमाग्र कक्षेचा सिद्धांत ( फ्रॉंटिअर ऑरबिटल थिअरी ) त्यांनी २५ वर्षांपूर्वीच मांडला होता. त्यानुसार सर्वांत सैलसरपणे केंद्राशी बद्ध असलेल्या व सर्वात बाहेरच्या इलेक्ट्रॉनांचे महत्त्व विक्रियाशीलतेच्या दृष्टीने अनन्यसाधारण असल्याचे दिसून आले. अणू अथवा रेणू संयुक्त होण्यापूर्वीचे आणि नंतरचे कक्षीय गुणधर्म सारखेच असतील, तर विक्रिया घडून येण्याची शक्यता जास्त असते. याचाच अर्थ कक्षीय सममिती टिकवून ठेवण्याची प्रवृत्ती निसर्गात आढळते. या सिद्धांतामुळे आतल्या इलेक्ट्रॉनांकडे दुर्लक्ष करून सर्वांत बाहेरील इलेक्ट्रॉन पुंजाची घनता व आकार काढून रेणू कसे संयुक्त होतील याविषयी भाकीत करता येणे शक्य झाले आहे.

फुकुई यांच्या संशोधनकार्याकडे त्यांच्या सहकाऱ्यांचेही दुर्लक्ष झाले होते. याचे संभाव्य कारण फुकुई पुढीलप्रमाणे देतात. " शुद्ध वा सैद्धांतिक रसायनशास्त्राचे संशोधन करून त्याचा उपयोग करून घेणारे पुरेसे शास्त्रज्ञ येथे ( जपानमध्ये ) नाहीत. " कधीकधी जपानच्या सर्वोत्कृष्ट अशा तंत्रवैज्ञानिक प्रगतीमुळे जपान्यांच्या सैद्धांतिक अथवा मूलभूत वैज्ञानिक संशोधनातील वैगुण्य झाकल्यासारखेच होते. अलीकडेच 'फिजिक्स टुडे' या नियतकालिकामध्ये सुप्रसिद्ध सॉनी संशोधन-केंद्रा-

तील माकोटो किकुची यांनी लिहिले होते, " जेव्हा आमच्यापुढे स्वच्छपणे लक्ष्य दिसत असते तेव्हा आम्ही जपानी लोक ते शिकून व समजून घेण्यात अतिशय तरबेज ठरतो; परंतु एखादी नवीन दिशा शोधण्याची वेळ येते तेव्हा मात्र आम्ही तेवढे कुशल ठरत नाही."

रोआल्ड होफमान यांचा जन्म पोलंडमध्ये झाला. काही काळ ते झेकोस्लोव्हाकिया, ऑस्ट्रिया व जर्मनी येथे होते. १९४९ साली ते अमेरिकेत आले आणि १९५५ साली ते अमेरिकेचे नागरिक झाले. १९६८ सालापासून ते कॉर्नेल विद्यापीठात रसायनशास्त्राचे प्राध्यापक आहेत. रासायनिक विक्रिया होईल की नाही, हे सांगणारे नियम त्यांनी स्वतंत्रपणे तयार केले आहेत. मात्र ते विकसित करताना त्यांनी फुकुई यांच्या वरील सिद्धांताचा वापर केला आहे. शेवटी १९६५ साली तेही फुकुई यांच्या निष्कर्षापर्यंत येऊन पोचले. जर सुरवातीच्या रेणूचे व अंतिम पदार्थाचे कक्षीय गुणधर्म माहीत असतील, तर विक्रिया घडेल की घडणार नाही याविषयी निर्णय घेणे शक्य होते, हे त्यांनी स्पष्ट केले आहे.

हे दोघेही रसायनशास्त्रज्ञ प्रत्यक्ष प्रयोगशाळेत क्वचितच काम करतात. या गोष्टीचे होफमान यांचे समर्थन पुढीलप्रमाणे आहे: "आम्ही गणित, भौतिकी, संगणक आणि पुष्कळ चर्चा यांचा वापर करीत असतो." पारितोषिक जाहीर झाल्यावर ते म्हणाले होते, "या ( माझ्या ) कार्यामुळे हजारो वैज्ञानिकांना दररोज घ्याव्या लागणाऱ्या निर्णयांमध्ये मदत होणार आहे." अर्थात त्यांचे हे म्हणणे खरेच आहे, कारण या दोघांच्या संशोधनामुळे प्रस्थापित झालेल्या नियमांमुळे पूर्वी ज्या विक्रिया प्रयोगशाळेत असमर्थनीय वाटल्या होत्या त्या सर्व प्रकारच्या विक्रियांविषयीचे अंदाज बांधणे शक्य झाले आहे; शिवाय त्यांच्यामुळे नवीन औषध वा रसायन मिळविण्यासाठी कोणता मार्ग स्वीकारला पाहिजे, हेही ठरविता येऊ शकेल.

---









अनुक्रमणिका

# महाराष्ट्रातील राजकीय परिवर्तन व सत्याग्रही शिंदे

रा. ना. चव्हाण

लो. टिळकांच्या काळात 'स्वराज्य' देखील लवकर मिळेल, असे वाटत नव्हते. पण पुढे एकपरी अकस्मात पूर्ण स्वातंत्र्यच आल्यामुळे व आता ते येऊन तीस वर्षांपेक्षा जास्त काळ लोटला असल्यामुळे स्वातंत्र्योत्तर काळ व स्वातंत्र्यपूर्व काळ यांची तुलना होणे अटळ असते. राष्ट्रीयसभा व तिचे स्वराज्यार्थ प्रयत्न ही एक अखिल भारतीय चळवळ होती. त्या चळवळीत भाग घेणारे पुष्कळ होते, पण ह्या ना त्या कारणाने तिच्या राजकीय चळवळीला विरोध करणारे विचारप्रवाह व पक्षदेखील होतेच. मुस्लिम लीग व दक्षिणेतील ब्राह्मणेतर चळवळ राष्ट्रीय सभेच्या विरोधात उभे ठाकले होते. डॉ. आंबेडकरांचा स्वोद्धारक दलित विचारप्रवाह व त्यांचा राजकीय पक्ष, हेदेखील म. गांधी व राष्ट्रीयसभा ह्यांना प्रतिकूल होते. राष्ट्रीय सभेतीलच अनुनयवादी नेमस्त पक्षाबरोबर जहालवादी टिळक लढले. तरी स्वातंत्र्य येईपर्यंत नेमस्त पक्ष अखिल भारतीय स्तरावर शहरी विभागात टिकून होता. म. गांधी हे शेवटपर्यंत हिंदु-मुसलमान ऐक्याचा पुरस्कार व प्रचार करून मुस्लिमांत राष्ट्रीय भावना रुजविण्याचा प्रयत्न करीत होते. कोणत्याही चांगल्या मुद्द्याला व दृष्टिकोणाला यश आले नाही, म्हणून दृष्टिकोणच त्याज्य व चुकीचा असे समजण्यात, दुसरी चूक होण्याचा संभव नसतो, असे नाही; कित्येक वेळा यश येण्यास फार उशीर लागतो. काळ-वेळ, प्रयत्न व अनुभव अनुकूल व्हावा लागतो. उदा. महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर चळवळीला राष्ट्रीय वळण लागण्यासदेखील तप-दीड तपांचे प्रयत्न कारणीभूत झाले. शाहू महाराज कोल्हापूरकर हयात असेपर्यंत तरी लो. टिळकांच्या जहाल राजकारणाला विरोध करणारी मोठी फळी महाराष्ट्रात तयार व सज्ज होती. ह्याची कल्पना टिळकांना त्यांच्या उत्तरायुष्यात विशेषत्वाने येऊ लागली; ह्या काळातील त्यांचे केसरीतील लेखन आजही हे दर्शविते. लो. टिळकांनंतर नरसोपंत केळकरांना तर विरोधाला अधिकच तोंड द्यावे लागले. महाराष्ट्रातील ह्या विरोधी प्रवाह राष्ट्रीय सभेत प्रविष्ट होऊन, त्याने महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कबज्यात घ्यावी व तिच्यामार्फत सत्तेवर राष्ट्रीय धोरणातून यावे, असा जो विचार व आचार वर्धमान झाला, त्याचे श्रेय प्रामुख्याने एका त्यागी सत्याग्रही स्वातंत्र्यसैनिकाकडे जाते. म. गांधी ह्यांनी बहुजनांचा व ग्रामीण जनतेचा विश्वास संपादण्याचे अपूर्व व खास प्रयत्न केले, हे तर खरेच; पण सत्याग्रही शिंदे ह्यासंबंधाने म. गांधी यांच्याही अगोदर अविरत व एकाकी राहून झटत होते. सन १९१२/१३ सालीच त्यांनी 'राष्ट्रीय मराठा संघ' स्थापिला होता. ब्राह्मणेतर चळवळीच्या जरुरीपुढे ह्या संघाचा निभाव प्रथम लागलाच नाही. पण शिंदे यशापयश दोन्ही एकसारखेच मानीत व पुढे जात असत. त्यांची दृष्टी प्रथमपासून अखिल भारतीय व राष्ट्रीय असे. म्हणून अस्पृश्योद्धार व ब्राह्मोसमाज ही दोन् कार्ये एकाच वेळी राष्ट्रीय एकात्मकतेचा एक उद्योग (प्रयत्न) म्हणून त्यांनी आमरण स्वीकारली होती. याचे कारण त्यांच्याच शब्दांत द्यावयाचे झाल्यास त्यांचे पुढील वाक्य उद्धृत केल्याशिवाय राहावत नाही :– "आपल्या ह्या चमत्कारिक देशात जातिभेदरूपी सहस्रलिंग म्हणजे दुहीच्या हजारो खुणा किंवा लहरी दाखविणारा जबरदस्त तलाव आहे." राष्ट्रीय सभेत प्रथम सर्व जातिधर्मांचे लोक आले होते. पण पुढे शिंदे यांनी सांगितल्याप्रमाणे "... राष्ट्रीयदृष्ट्या आता जी हिंदुमुसलमानांची दुही आहे तिच्या ऐवजी वरील प्रकार घडलाच तर हिंदू,




मुसलमान, ख्रिस्ती यांचा तिरपगडा होणार!" आजही स्वातंत्र्य आल्यावर असेच फुटीरतेचे अनेक इतरही अनुभव देशाला येत आहेत व येण्याची शक्यता नाही, असे मुळीच नव्हे. देशभक्तीला प्राधान्य देऊन लो. टिळकानी लखनौ करार केला, तरी फुटीर राजकारण थांबले नाही; उलट वाढून वेगळे पाकिस्तान झाले. असे होण्यास लोकमान्यांना जबाबदार धरणे अयोग्य होय. ह्याला पूर्वेतिहास व इंग्रजांचे वाढते फोडा व झोडा हे धोरण जास्तीत जास्त कारण झाले. ब्राह्मणेतरांचे व डॉ. आंबेडकरांचेही तत्सम राजकारण परकीयांना सोईचे होऊ लागले. हे राजकारण पृथकतेला उपयोगी होऊ नये, हा शिंद्यांच्या काळजीचा व काळजाचा विषय होता. पृथक राजकारणाला शिंदे यांना पाठिंबा देणे अवघड व राष्ट्रीयदृष्टचा फारच गैरसोईचे झाले.

## शेतकरी आणि काँग्रेस

इ. स. १९२५-२६ सालापासून शेती व शेतकरी हा विठ्ठल रामजींचा चिंतनाचा, अभ्यासाचा व उत्तरोत्तर वाढत्या निरीक्षणाचा विषय झाला. पुणे, तेरदळ, बोरगाव वगैरे ठिकाणी झालेल्या शेतकरी परिषदांची अध्यक्षस्थाने त्यांच्याकडेच दिली गेली. "तुम्ही आपली स्वतःची संघटना करा; इतकेच नव्हे, तर शहरांतील कामगारांच्या संघटनेशी खांद्याला खांदा लावून मिळून संघटना करा. ... ही जोडघटना साधणे अत्यावश्यक नाही काय?" शेतकऱ्यांना स्वयंनिर्णय असावा, असे सांगून १९३१ साली वडनेर (ता. चांदवड) येथील शेतकरी परिषदेत 'शेतकरी व भांडवलदार' ह्यासंबंधी मूलगामी विचार मांडले. शेतकरी कामगार यांची संघटना असावी व हिची गरज ब्राह्मणेतर पक्ष वेगळा अस्तित्वात असतानाही वाटत होती; जातीय स्वरूपाची ब्राह्मणेतरांची पृथक संघटना नसावी. मागे तर त्यांनी 'बहुजन-पक्ष' हे नाव त्याला सुचविले होते. त्यांची शेतकरी परिषदांमधीऊ व्याख्याने अभ्यासल्यास त्यांना शेतकरी व कामगार पक्ष असावा असे वाटत असावे! पण त्यावेळीदेखील शेतकरी लोकांतील पुढाऱ्यांची अपात्रता त्यांच्या अनुभवास येत होती. मराठे लोकांनी सत्यशोधक समाजाचा राजकारणासाठी आश्रय घेतला होता, पण त्यांना सत्यशोधक समाजाची पद्धतशीर तात्त्विक व संघटित बांधणी वारंवार सांगूनही करता येत नव्हती. ह्यामुळेही विवेकी शिंदे ह्यांना त्यांतून फारसे इष्ट व विधायक निर्माण होईल असे वाटत नव्हते. सन १९२३ ते १९३० पर्यंत 'विजयी मराठा' पत्रातून त्यांनी सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळीच्या बाजूने खूप विद्वत्तापूर्ण लिहिलेले होते; अनेकांची दुर्मते त्यांनी साधार खोडून काढली. शिंदे यांचे बहुतेक लेख व भाषणे चालू पिढीला आता उपलब्ध आहेत. कोणत्याही पक्षाची बांधिलकी न पतकरता तटस्थ व निःपक्षपाती विचार केल्यामुळे त्यांच्याकडून काँग्रेस संबंधीही साधक-बाधक विवेक पूर्वीच झाला होता. तो महत्त्वाचा आहे. आनुभविक विचारसंभाराला द्रष्टेपण प्राप्त झाले आहे व ह्यात आत्मपरीक्षणाचाही मोठा भाग आहे. त्यांना निकृष्ट, निराश्रित व सर्वसामान्य दुःखी माणूस सुखी व्हावा, म्हणून स्वराज्य पाहिजे होते.

## म. गांधी व काँग्रेस

तटस्थ कार्यकर्ता विचारवंत असला तरी राजकारणाच्या वाटचालीत त्यालाही उपलब्ध योग्य पक्ष घ्यावा लागतो. महर्षि शिंदे यांचा संबंध म. गांधी यांच्याशी पहिल्या महायुद्धापूर्वीपासूनच आला. गांधी आफ्रिकेत कार्य करीत असतानाही शिंदे यांना त्यांच्या संबंधाने फार आशा वाटत होती. याचे एक कारण असे होते की, म. गांधी ह्यांचे अस्पृश्यता निवारणाला उघड अनुकूल मत होते. डोक्याला रुमाल व पूर्ण गुजराथी पोषाख गांधी घालीत होते. तेव्हा शिंदे त्यांना चांगले ओळखत होते. शिंदे यांनी एक सभा पुणे येथे अस्पृश्यांच्या वस्तीत घेतली होती. सभेच्या अध्यक्षस्थानी शेतकी कॉलेजचे त्यावेळचे एक प्रमुख पां. चि. पाटील होते. सभा चालली असताना खुद्द वरील पोषाखात गांधी येऊन श्रोत्यांत बसले. अध्यक्ष व श्रोते यांच्यापैकी कोणालाही गांधी ठाऊक नव्हते! आभार मानताना कर्मवीर शिंद्यांनी गांधींची ओळख सर्वांना करून दिली. म्हणजे सर्व देशाला गांधी महात्मा म्हणून ठाऊक होण्यापूर्वीची गांधी-शिंदे यांची मैत्री व ओळख होती. 'गुणिनां गुणिः वेत्ति ।' हा न्यायदेखील खरा असतो. अलाहाबाद काँग्रेस अधिवेशनापूर्वीपासून म. गांधी देशाला उत्त-

अनुक्रमणिका

रोत्तर ज्ञात होऊ लागले; गांधी क्रमेण क्रमेण स्वप्रयत्नेकरून सर्व देशाचे नेते झाले. शिवाय ते मानवतावादी नेते होते. गांधी आणि काँग्रेस ह्या दोन मुख्य बाबी त्या वेळच्या राजकारणात प्रमुख व प्रभावी होत्या. म्हणून भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न जर राष्ट्रीय सभेने हातात घेतला तर त्याच्या सोडवणूकीची कक्षा वाढेल, अशा समजुतीने वि. रा. शिंदे यांनी अस्पृश्यतानिवारणाचा सामाजिक ठराव राष्ट्रीय सभेत पास करून घेतला; चार पाच वर्षे प्रयत्न करावा लागला. लोकमान्य टिळकांचाही ह्या ठरावाला विरोध नव्हता, हे विसरले जाते. राष्ट्रीय सभा राजकीय सुधारणा व्हाव्यात अशा मताची होती, व तिच्यामध्ये सामाजिक-धार्मिक विषयांचा व प्रश्नांचा संबंध नसावा, अशा मताचे बहुतेक पुढारी होते. विचारांती आजही सजीव असलेल्या ह्या जुनाट प्रश्नाला म. गांधी, ॲनी बेझंट वगैरे सर्वांनी एक महत्त्वाचा राष्ट्रीय प्रश्न म्हणून मान्यता दिली. ह्याप्रमाणे भारतीय अस्पृश्यतेच्या प्रश्नाचे राष्ट्रीयकरण झाले. म्हणजे अस्पृश्यतानिवारण हे काँग्रेसचे व गांधी वगैरे सर्व राष्ट्रीय पुढाऱ्यांचे एक स्वराज्य मिळविण्याइतके महत्त्वाचे कर्तव्य आहे, असे देशपातळीवरून राष्ट्रीय सभेने मान्य केले. भारतीय अस्पृश्यतानिवारक प्रश्नाच्या इतिहासातील म्हणजे दलित प्रश्नांच्या वाटचालीच्या प्रयत्नांतील हा एक क्रांतिकारक ठराव होता.

ह्या काळात काँग्रेस गावपातळीपर्यंत जाऊन पोहोचली नव्हती; व राष्ट्रीय सभेच्या वरील स्पृश्य राजकीय पुढाऱ्यांनी केलेल्या ठरावाची डॉ. आंबेडकरांना मुळीच मातब्बरी वाटली नाही. राष्ट्रीय सभेकडे पाहण्याची डॉ. आंबेडकरांची दृष्टी म. फुले यांच्याप्रमाणे विरोधी व सहानभूतीशून्य होती, ह्याला सामाजिक कारणे होती. अस्पृश्यांच्या प्रश्नासारखा पण फार मोठी संख्या असलेल्यांचा तसाच दुसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे शेतकऱ्यांचा व ग्रामीण जनतेचा होता. म. गांधींचे लक्ष ह्या बहुजनसमाजाचा पाठिंबा स्वराज्याच्या लढ्याला मिळावा, म्हणून सक्रीयपणे पुढे विकसित होत गेले. कारण केवळ उच्चभ्रू व फक्त शहरी लोकांच्या पाठिंब्यानेच कार्यभाग होणार नाही. सन १९२० साली लो. टिळक वारले व त्यांचे प्रतिस्पर्धी शाहू पुढे सन १९२२ साली वारले; व देशाचे आणि प्रांताचेही नेतृत्व कोणास द्यावे, हा प्रश्न उभा होताच. टिळकांचे अनुयायी टिळकप्रवाह टिकून वाढावा असे इच्छित होते. शाहूंचा पक्ष त्यांच्या निधनानंतर दहा पंधरा वर्षे तग धरून होता. मद्रास व कर्नाटक अशा दक्षिण प्रांतांतही होता. सन १९२० सालापासून म. गांधींची चळवळ वाढू लागली. मिळालेले काही हक्क अगदीच तोकडे पडू लागले. रावबहाद्दूर व रावसाहेब – जे. पी. होऊन व संस्थानिकांचा अनुनय करून शेतकरी जनतेचा व अस्पृश्यांचाही प्रश्न सुटणार नाही असा देशभक्त शिंद्यांना पडताळा येऊ लागला. मुसलमानांच्या पृथक राजकीय अस्मितेचे वळण ब्राह्मणेतर व अस्पृश्यांची स्वतंत्र राजकारणे घेऊ लागली; स्वराज्याच्या प्रयत्नाच्या दृष्टीने हे अयोग्य होते. कारण इंग्रजांकडून मिळालेले व पुढे हप्त्या-हप्त्याने देऊ केलेले हक्क कोणाचेही समाधान करणारे नव्हते !

## शिंद्यांची राष्ट्रीय हाक

सन १९३१ साली वडनेर ( ता. चांदवड) येथे भरलेल्या शेतकरी परिषदेत सत्याग्रही शिंदे यांनी पुढील राष्ट्रीय हाक दिली :

"काँग्रेस जोपर्यंत महात्मा गांधी व पंडित जवाहरलाल वगैरे सारख्यांच्या मुठीत आहे तोपर्यंत तरी, ती तुमच्या बाजूस राहील असा मला भरवसा आहे. म्हणून तुम्हीही तिला आपला पाठिंबा सरळ मनाने व सढळ हाताने द्याच...काँग्रेस जोपर्यंत तुम्हाला अनुकूलच आहे तोपर्यंत तुम्हीही तिच्या उलट जाण्याचे कारण काय ?...तिच्याशी प्रतारणा करण्यात तुमचे तिळमात्र हित नाही...काँग्रेसचे कार्य बहुतांशी आणि आता तर सर्वांशी राजकारणाचे आहे...काँग्रेस म्हणजे साऱ्या देशाच्या म्हणजे त्यातील सर्व वर्गांच्या कल्याणासाठी विचार करणारी व त्या विचाराचा अंमल बजावणारी संस्था आहे. थोडक्यात सांगायचे तर ती आमची भावी पार्लमेंट आहे."

सन १९३०–३१ पूर्वीच पुढे काँग्रेसकडे देशाची सत्ता जाईल असे सांगणारे सत्याग्रही शिंदे द्रष्टे पुरुष नव्हते काय ?

"...तूर्त महात्मा गांधींसारख्या लोकोत्तर सत्पुरुषाच्या हाती काँग्रेसचे सर्वाधिकार आहेत..." विशेषत: गांधीजींच्या लोकाभिमुख नेतृत्वाकडे शिंदे आकृष्ट झाले.

महात्मा गांधी व त्यांच्या लढ्यात सामील होण्यासाठी बहुतेक सर्व सत्यशोधकांनी नंतर उडी घेतली. ह्याची प्रवृत्ती प्रयत्नपूर्वक कोणी केली, ही प्रेरणा कोणाची होती, हे राष्ट्रीय राजकारण कोणी केले, राष्ट्रीय विचार कोणी दिले ह्या संबंधीचे प्रामुख्याने श्रेय कोणाकडे जाते ह्याबद्दल संदर्भपूर्वक माहिती नव्या पिढीला नाही. बहुजनसमाज त्यातल्या त्यात महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर जनता म. फुले–शाहू यांच्या नेमस्त व सहकारवादी राजकारणामुळे अव्वल इंग्रजीपासून दूर होती, ती काँग्रेस व म. गांधींच्या सत्याग्रही लढ्यात पुढे अग्रभागी झाली. ही सामाजिक क्रांती म्हटली पाहिजे. कारण तत्पूर्वी चाललेला एकपरी शुष्क क्रियाप्रतिक्रियावादी वादाचा सामाजिक काळ पडद्याआड झाला, पुढे निदान भूमिगत झाला! आणि गांधींच्या लढ्यात सामील व्हावयाचे का दूर राहावयाचे, हा प्रश्न सन १९२९ नंतर नव्या पिढीपुढे उभा राहिला.

## सन १९३० चा सत्याग्रही लढा

सन १९२० पासून गांधी यांची असहकार व स्वदेशीची चळवळ चालू झाली होती. लोकमान्यांचेही कित्येक अनुयायी म. गांधी यांच्या नव्या मार्गाकडे आकृष्ट झाले. म. गांधी यांचा सामाजिक सुधारणांना विरोध नव्हता. राममोहनपासून देशात नेमस्तपणे व सनदशीररीत्या राजकीय अर्ज-विनंत्या करण्याचा प्रयत्न पुष्कळ सामाजिक व धार्मिक सुधारक करीत होते. फार काय, ह्यांनीच राष्ट्रीय सभेचे तिच्या बालपणी प्रथम संगोपन केले. महाराष्ट्रापुरतेच बोलावयाचे झाल्यास टिळकांनी समाजसुधारकांचे नेमस्तपण मोडण्याचा प्रयत्न तीव्रतेने केला. अपवादात्मकपणे टिळकांचा जहाल उद्देश सामाजिक सुधारकांच्याच प्रवाहातील असलेले पण खूप अंशी आगळे व वेगळे, अशा शिंद्यांच्या लक्षात आला व ते टिळकांच्या स्वराज्यवादी राजकारणाला समीप झाले. गांधी भारतीय राजकारणाच्या क्षितिजावर येताच गांधींकडे लवकरात लवकर वळणे त्यांना सोपे गेले. पुढे बहुजनसमाजातील कार्यकर्त्या तरुण पुढाऱ्यांना बराच वेळ लागला. सायमन कमिशनपुढे कोणत्या मागण्या मांडाव्यात ह्यातच पुष्कळ मश्गुल होते. वाटाघाटी फसल्यानंतर त्यावेळचे तरुण पुढारी केशवराव जेधे यांनी व त्यांच्या मित्रांनी तरुण अनुयायांसह म. गांधी यांच्या लढ्यात उतरण्याचा ठराव स्वपक्षात पास करून घेतला. जेधे व त्यांच्या मित्रांवर कर्मवीर शिंद्यांची प्रत्यक्षाप्रत्यक्ष छाप होती. पण वयोवृद्ध व जुने पुढारी गांधी लढ्यापासून अलिप्तच राहिले; किंबहुना विरोधी झाले! हे पुढीलप्रमाणे पाहाणे कुतूहलजनक वाटेल; कारण जुने नेतृत्व निष्प्रभ होऊन गतेतिहासात सामील झाले! महाराष्ट्रात नव्या युगाला प्रारंभ झाला.

## गु. शिंदे यांना जबर शिक्षा

मागे बहुजनसमाजाचे मुखपत्र म्हणून गाजलेला 'विजयी–मराठा' (पुणे) दि. १९ मे १९३० च्या अंकात पुढील उद्गार काढता आला :– "ते (गु. शिंदे) ब्राह्मणेतर पक्षाचे सभासद नव्हते ...... ब्राह्मणेतर पक्षाचा किंवा इतर व्यक्तींचा त्यांच्याशी कितीही मतभेद असला तरी मागासलेल्या बहुसंख्याक वर्गासंबंधीच्या त्यांच्या कळकळीबद्दल दुमत नाही. गु. अण्णासाहेब निर्ढावलेले त्यागी व सहनशील धर्मात्मे असले तरी त्यांना इतक्याव् द्धापकाळी देण्यात आलेल्या सहा महिने सक्तमजुरीच्या शिक्षेबद्दल कोणीही निषेधच करील."

जेधे व त्यांचे जवळकर, बागल, मोरे, नाना पाटील वगैरे लहानमोठे म्हणजे प्रसिद्ध व अप्रसिद्ध कार्यकर्ते सत्यशोधक समाज व ब्राह्मणेतर पक्ष यांच्याकडून गांधी व काँग्रेस यांच्यामध्ये आले. पण महर्षि शिंदे ब्राह्मोसमाजाकडून गांधीवादी झाले. प्रथमपासूनच देशाला ब्राह्मोसमाजाने त्यागी पुढारी दिले होते. कॉ. एम्. एन्. रॉय पुढे प्रसिद्धीस चढले, पण प्रारंभी ते क्रांतिकारक ब्राह्मो कार्यकर्त्यांच्या सहवासात आले. गांधींच्यावरही व इतर पुष्कळांवर त्याकाळच्या आधीपासून राममोहन व केशवचंद्र सेन वगैरे पहिल्या पुढाऱ्यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष प्रभाव होता. रानडे-गोखले-चंदावरकर यांच्यावरही हा परिणाम उत्कट होता, तरी ह्यांच्या विचारप्रभावाचा परिणाम जवळून असतानाही शिंदे हे एकटेच सक्रीय सत्याग्रही झाले. बहुतेक नेमस्त पुढारी मंडळीने त्यांचा प्रागतिक पक्ष स्वातंत्र्य येईपर्यंत टिकवून धरला. महाराष्ट्रात गांधींच्या सत्याग्रही लढ्यात महर्षि शिंदे पुणे काँग्रेसचे डिक्टेटर झाले. ह्या संबंधात 'बॉंबे क्रॉनिकल' (दि. १४ मे १९३०) च्या अंकातील प्रति-

क्रिया वरील सर्व विवेचनाच्या दृष्टीने महत्त्वाची वाटेल :–

**Mr. Shinde's Arrest**

"At 2 P. M. today V. R. Shinde the non-Brahmin leader of Poona and a worker for the uplift of the Depressed classes was arrested at his residence and was taken to Khed immediately. Latterly he was doing excellent propogution work by way of lectures in the Villages. He concentrated mainly on the improvement of the condition of the villagers by prohibition education, etc. His soul always pained for the uplift of the masses for the very purpose, he was eleeted President of the Shetkari Conference held in 1928 in Poona in connection with land Fragmentation Bill. His arrest will create commotion among the non-Brahmins."

'बॉम्बे क्रॉनिकल'च्या भाकिताप्रमाणे बहुजनसमाजात तर खळबळ उडालीच, पण मुंबईच्या गव्हर्नर व त्याच्या मंत्रीमंडळातही काळजीचे वातावरण वाढले; व शिंदे यांचे मन वळविण्यासाठी एका ब्राह्मणेतर पक्षीय महत्त्वाच्या मंत्र्याची योजना झाली ! दि. २६ जुलै १९३० च्या केसरीने पुढील स्फूट लिहिले होते:–

'रा. विठ्ठलराव शिंदे यांची ना. भास्करराव जाधव यानी तुरुंगात जाऊन भेट घेतली. दोघांची दोन तास वाटाघाट झाली. जाधव यांनी त्यांस सांगितले की, "ही चळवळ वेडेपणाची आहे. अशा फंदात मी पडणार नाही असे तुम्ही सांगा म्हणजे तुमची तुरुंगातून लागलीच सुटका होईल," विठ्ठलरावानी त्यांस खडखडीत उत्तर दिले की– "मी ही गोष्ट कधीही कबूल करणार नाही, तुरुंगातून सुटल्यावर ही चळवळ मी पुनः चालवीन." ' त्यांनी अशी माफी मागण्याची गळ घातली असतानाही मुळीच माफी मागितली नाही. ह्याचाही परिणाम महाराष्ट्रातील बहुजनसमाजावर झाला.

"अण्णासाहेब शिंदे यांची येरवडयाच्या तुरुंगातून ता. १४ रोजी सुटका झाली. शेतकऱ्यांना जंगल सत्याग्रहाबाबत उत्तेजन दिल्याच्या आरोपावरून यांना सहा महिने सक्तमजूरीची शिक्षा ठोठावण्यात आली होती. तरी त्यांनी ती माफी न मागता धैर्याने उतारवयात सहन केली." दि. १७-१०-३० च्या दीनबंधुने अशी स्वच्छ प्रतिक्रिया व्यक्त केली. शिंद्यांचे अनुपलब्ध लेख शोधीत असताना वरील वृत्तपत्रांचे दुर्मिळ अंक मिळाले. दलितांच्या प्रश्नाची सोडवणूक करणे झाल्यास उभय समाजात सलोखा, सहकार्य, समन्वय हाच मार्ग शिंद्यांना जास्त अभिप्रेत होता. राजकीय धार्मिक पृथकता (वेगळा मतदारसंघ वगैरे) शिंद्यांना नामंजूर होती, पूर्वास्पृश्यांमधील जातिभेद, अल्पसंख्य व बहुसंख्यभेद व इतर विसंघटनेच्या बाबी जास्त आडव्या येतात, असा शिंद्यांचा अनुभव होता.

## काही सारासार विचार

मात्र राजकारणाच्या प्रांतात महर्षि शिंदे यांच्या प्रेरणेने योग्य तेच आणि योग्य वेळी राजकीय परिवर्तन झाले. पण अस्पृश्यता निवारण व दलितांचा प्रश्न ह्यासंबंधात शिंदे यांना बहुजनसमाजाने फारसे अनुसरले नाही. त्यांच्या स्त्रीविषयक उदार व समान विचाराकडे अजून ग्रामीण जनतेने पाहिलेही नाही. म्हणून तो मागे आहे. सामाजिक-धार्मिक सुधारणांच्या प्रसाराचा फारच थोडयांवर परिणाम झाला. शेतकऱ्यांसाठी सर्वांगीण प्रबोधन कोणते असावे, हे त्यांनी सांगितले होते, ह्याची स्मृती नाही. समाज परिवर्तन हे राजकीय परिवर्तनापेक्षा अवघड असते, असाही ह्यातून निष्कर्ष निघाला. शेतकऱ्यांच्या अनेक परिषदांतून दलितांच्या जटील प्रश्नांबाबत शिंदे यांनी ग्रामीण जनतेची कान उघाडणी निर्भिडपणे केली.

डॉ. आंबेडकर यांच्या स्वावलंबी नेतृत्वाखाली अस्पृश्यांची स्वोद्धारक स्वतंत्र चळवळ ह्याच काळात चालू झाली होती. त्यांच्या 'बहिष्कृत भारत' ह्या पत्राच्या जुन्या फाईल्स पाहाण्याची मला संधी प्राप्त झाली. ह्यावरूनही म्हणता येते की, समाज परिवर्तन वर सांगितल्याप्रमाणे जनसमाजास अवघड गेले व यद्यपी जाते. सर्वच लोक अस्पृश्योद्धारक प्रयत्नांना अनुकूल नव्हते व आजही दलितप्रश्नांच्या

बाबत मनातूनही अनुकूल नाहीत. डॉ. आंबेडकर यांनी महारवतन बिल त्यावेळच्या मुंबई कौन्सिलात आणले होते. सदरहू बिल सिलेक्ट कमेटीकडे गेले, तेव्हा त्या बिलाला कौन्सिलातील ब्राह्मणेतर पक्षाचे प्रमुख पुढारी नगरचे नामदेवराव नवले यांनी विरोध केला ! डॉ. आंबेडकरांनी ह्यासंबंधात कडवी टीका केली. सन १९२८ सालातच वरील "बहिष्कृत भारतात" खेडचापाडचांतील स्पृश्य मराठे लोक अस्पृश्यांवर अन्याय करतात, असे स्वच्छ लिहिले होते व त्यासारख्या कारणांमुळे डॉ. आंबेडकर स्वतंत्रपणे कार्य करू लागले. जोतीबांचा 'शूद्रातिशूद्र' हा समास होता, त्याचा ह्या कारणामुळे विग्रह झाला. दुसऱ्या जहाल राजकीय राष्ट्रीय धोरणाच्या बाबतीत डॉ. आंबेडकर व ब्राह्मणेतर चळवळ ह्यांमध्ये मतभेद झाले. मनमाड येथील भाषणात डॉ. बाबासाहेब म्हणाले, "आपले घर मोडून दुसऱ्याच्या हवेलीत (कॉंग्रेसमध्ये) शिरणे म्हणजे मोठा मूर्खपणा आहे. आपली झोपडी शाबूत राखा, तसे न झाल्यास ब्राह्मणेतर पक्षाप्रमाणे आपली स्थिती झाल्याशिवाय राहाणार नाही. ब्राह्मणेतर पक्षाची दुर्दशा झाली. त्यांना आता पश्चात्ताप होतो; सन १९३२ पर्यंत संगनमताने (आम्ही) काम करीत होतो." वगैरे. ह्याच प्रकारे ब्राह्मणेतर पक्षाच्या कॉंग्रेसप्रवेशाबाबत आणखी दोनचार ठिकाणी आंबेडकरांनी पूर्ण नापसंती व्यक्त केलेली आढळते. लो. टिळकांच्या समीप शिंदे जितके गेले तितके पुढे विचारानेदेखील डॉ. आंबेडकर कधीच गेले नव्हते.

डॉ. आंबेडकरांना कधीच गांधीमार्ग पसंत पडला नाही. शिंद्यांना राष्ट्रीय चळवळ व गांधीवाद जास्तीत जास्त शेवटपर्यंत पसंत असे. शिंदे सामाजिक व धार्मिक बाबतीतही सत्याग्रही होते. पर्वती व वाकोम येथील मंदिरप्रवेश सत्याग्रहात त्यांनी भाग घेतला होता; मात्र डॉ. आंबेडकरांना फुले-शाहू यांचे राजकारण व समाज आणि धर्मकारण अधिकाधिक जवळचे वाटले. तथापि शिंदे यांनी डॉ. आंबेडकर, म. गांधी व श्रीमान यशवंतराव चव्हाण ह्या तिघांसाठी पाया तयार केला. तथापि ह्या सर्वांना संमत असलेला दलितांचा प्रश्न स्वातंत्र्यातही उत्तरोत्तर गुंतागुंतीचा होत आहे. स्वराज्य येण्यापूर्वीच हा सुटणे भाग होते, उलट हा दीर्घकालीन दिसू लागला ! हा सर्व प्रश्न सोडविणे म्हणजे सततचा सावधपणे करण्याचा "लॉंग मार्च" वाटतो! असो. एवढे खरे की, बहुजनसमाजाने कॉंग्रेसप्रवेश केला. जेधे-गाडगीळांच्या निवडणुकीला संयुक्त पाठिंबा देऊन त्यांना निवडून आणले. देव-देवगिरीकर वगैरेंच्या ताब्यातून कॉंग्रेसची सोडवणूक होऊन ती महाराष्ट्रात महनीय यशवंतरावांच्या पूर्ण कबज्यात गेली होती. शिंद्यांचे अर्धे स्वप्न पुरे झाले, पण अर्धे अर्धवट राहिले ! पुढे काय ?

### कॉंग्रेसची चिकित्सा

स्वातंत्र्यात कॉंग्रेसपक्षाच्या माध्यमातून सत्तेवर येणे, हे बहुजन समाजाने शक्य केले. पूर्वी ब्रिटिश सरकारविषयीचा म. फुले यांच्यापासून चालत आलेला पूज्यभाव, व संस्थानिकांच्या मदतीने व सहकार्याने कार्य करण्याचा अनुनयवाद सोडून महाराष्ट्राने एक राजकीय परिवर्तन सिद्ध केले. "महात्मा गांधींचा उदय होईपर्यंत आमच्या कॉंग्रेसचेही लक्ष खेडचांतील लोकांकडे लागले नव्हते. इतकेच नव्हे, तर शहरांत राहाणाऱ्या मजुरांकडे व अस्पृश्य वर्गाकडे प्रत्यक्ष कॉंग्रेसचा कानाडोळा व प्रसंगविशेषी विरोधही होता." ह्या शिंद्यांच्या उद्गारांच्याद्वारे फुले-शाहू व डॉ. आंबेडकर हे कॉंग्रेसपासून दूर का होते, ह्याचा छडा लागतो. राऊंड टेबल कॉन्फरन्समध्ये गांधी आणि कॉंग्रेस ह्यांनी भाग घेतला होता. "हिंदू-मुसलमान, ब्राह्मण–ब्राह्मणेतर, स्पृश्य-अस्पृश्य, संस्थानिक-खालसातले हे व इतर आगंतुक भेद असावयाचेच. ह्या भेदामुळेच तर लंडन येथे गेलेल्या शेकडो शहाण्यांच्या वाटोळचा परिषदेची शोभा झाली..." आजही वरीलसारखे नवे व मूळचे जुने भेद राजकारणाची शोभा वाढवीत आहेत ! कॉंग्रेसच्या मर्यादादेखील परखडपणे शिंदे यांनी तेरदळ येथील शेतकरी परिषदेत सांगितल्या होत्या. उदा. "कॉंग्रेस स्वतः श्रीमंतांच्या हाती गेली आहे आणि जाणे साहजिक आहे." शेतकऱ्यांच्या प्रश्नावर सडेतोड विचार व्यक्त केल्यामुळे पुष्कळांना वाटले की, शिंदे जणू काही रशियन–बोल्शेव्हिक विचाराचे आहेत. कारण भांडवलशाहीची चिकित्सा त्यांनी केली. लोकशाहीच्याद्वारे समाजवाद आणण्याचा शिंदे यांना



अनुक्रमणिका

अभिप्रेत असणारा अहिंसावादी मार्ग काँग्रेस स्वातंत्र्यातही आणू शकली नाही. म्हणून ... "प्रत्यक्ष काँग्रेसवरही अवलंबून राहू नका. हे सांगण्यात मी काँग्रेसचा अपमान करीत नसून, केवळ तुम्हाला सावध करीत आहे. काँग्रेसचे कार्य बहुतांशी आणि आता (सन १९३१ साली चांदवड तालुका शेतकरी परिषद भरली त्या काळात) तर सर्वांशी राजकारणाचे आहे. मी तुम्हाला (कष्टकरी लोकांना) स्पष्ट बजावीत आहे की, तुमच्यापुढे कार्य मुख्यतः राजकारणाचे नसून ते अर्थकारणाचे किंवा सामाजिक स्वरूपाचे आहे." अशी चिकित्सा करताना शेतकऱ्यांचे प्रश्न प्रत्यक्ष पुढे काँग्रेसही सोडविल किंवा नाही, ह्यासंबंधात अनेक इषारेवजा शंका व्यक्त केल्या आहेत. शिंदे यांनी द्रष्टेपणानें व्यक्त केलेल्या शंका स्वातंत्र्यातील तीस वर्षे झाल्यानंतरही अनुभवास येत आहेत. म्हणून हा विषय सर्वांच्या अद्यावत विचाराचा ठरतो. सावध, सूक्ष्म व दूरगामी विचारवंताची मानसिक अवस्था कशी होऊ शकते, याचा हा एक मासला आहे. काँग्रेसच्याद्वारे का होईना, बहुजनसमाजाचे राज्य होऊ शकेल असे नंतर सर्वांना वाटले; व मूळचा राजकीय ब्राह्मणेतर पक्ष संपला! डॉ. आंबेडकरांनी मात्र जेधे यांना राजकीय पाठिंबा मुळीच दिला नाही. त्यांनी त्यांचे राजकारण पुढे रेटले. दुसऱ्या बाजूने केळकर-भोपटकर-सावरकर हे काँग्रेसपासून वरील काळातच दूर गेले. वरील पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील बहुजनसमाजाचे काँग्रेसमध्ये विलीनीकरण झाले; पुढे माननीय यशवंतरावांनी नेतृत्व केले. एवढाच टप्पा विचारात घ्यावयाचा होता.

## ग्रंथ–परीक्षण

**बॅटल ऑफ खर्डा : चॅलेंजिस अँड रिस्पॉन्सिस**– जी. टी. कुलकर्णी व एम्. आर्. कंटक; डेक्कन कॉलेज पोस्ट-ग्रॅज्यूएट अँड रिसर्च इन्स्टिटयूट, पुणे ४११००६; पृष्ठे २२३; मूल्य ४० रुपये.

मराठ्यांच्या इतिहासाचे व्यासंगी अभ्यासक प्रा. डॉ. जी. टी. कुलकर्णी व डॉ. एम्. आर्. कंटक यांनी 'बॅटल ऑफ खर्डा : चॅलेंजिस अँड रिस्पॉन्सिस' या पुस्तकात प्रथमच खर्ड्याच्या युद्धाविषयी प्रकाशित व विशेषतः अप्रकाशित साधनांच्या द्वारे सांगोपांग चर्चा करण्याचा प्रयत्न केला आहे. पुस्तकाच्या शीर्षकावरून या लेखकद्वयीस नेमक्या कोणत्या मुद्द्यांचा ऊहापोह करावयाचा आहे, याची कल्पना येते. या विषयावर पूर्वी, सर्वश्री वासुदेवशास्त्री खरे, कासिम अली, गो. स सरदेसाई, त्र्यं. शं. शेजवलकर, सेतू माधवराव पगडी इत्यादींनी लिहिले आहे. त्यांच्या मतांचे उचित स्थळी या लेखकांनी खंडन व मंडन केले आहे. हे युद्ध मराठ्यांच्या इतिहासातील सर्व मराठे सरदार एकत्र येऊन लढलेले अखेरचे युद्ध होते; त्यानंतर महाराष्ट्रात दुहीचे राजकारण पसरले आणि लवकरच मराठी राज्याची अवनती सुरू झाली. याची कारणमीमांसा या पुस्तकात या लेखकद्वयीने काटेकोरपणे अत्यंत समर्पक शब्दांत अस्सल ऐतिहासिक साधनांच्या आधारे सोदाहरण स्पष्ट केली आहे. अशा प्रकारचा प्रांजल प्रयत्न यापूर्वी मराठी इतिहासकारांनी केल्याचे फारसे आढळात नाही. त्यामुळे या पुस्तकाने मराठी इतिहासाच्या अभ्यास-संशोधनात मोलाची भर घातली आहे, असेच म्हणावे लागेल.

लेखकद्वयीने या २२३ पृष्ठांच्या पुस्तकाची विभागणी सोयीस्कर अशा सहा प्रकरणांत केली आहे. सुरुवातीस प्रस्तावना असून शेवटी पृ. १०१ ते १८५ मध्ये अ व ब अशी दोन परिशिष्टे दिली आहेत. त्यांत एकूण पंचाणव अप्रकाशित मूळ अस्सल पत्रे व इतर कागद छापले आहेत. वाचकांच्या सोयीसाठी प्रत्येक ठिकाणी मूळ साल डावीकडे दिले असून त्याचा ख्रिस्ती सन उजवीकडे दिला आहे. शिवाय परिशिष्टे देण्यापूर्वी ती कोठे उपलब्ध झाली, त्यांचे लिप्यंतर कोणी केले वगैरे माहिती उद्धृत केली आहे. परिशिष्टांनंतर अभ्यासू संशोधकास उपयुक्त होईल अशी मूळ व नवीन संदर्भग्रंथांची यादी दिली असून मूळ पुस्तकाची सूची इंग्रजीत आणि परिशिष्टांची सूची मराठीत दिली आहे. याशिवाय या पुस्तकात एकूण आठ चित्रपत्रे आहेत. त्यांत सवाई माधवराव, नाना फडणीस, अझिम उल् उमरा, मिर अलम यांची व्यक्तिचित्रे आणि खर्ड्याच्या युद्धाचा मूळ नकाशा, खर्ड्याचा युद्धप्रसंगीचा नकाशा व दोन्ही सैन्यांच्या हालचाली दर्शविणारा नकाशा व निझामाचा दरबार यांची रेखाचित्रे आहेत. यातील लढाईच्या मूळ नकाशामुळे चिकित्सक अभ्यासकास खर्ड्याच्या लढाईचे लष्करी डावपेच व सैन्याच्या हालचाली यांचे सम्यक ज्ञान होते.

प्रस्तावनेत लेखकांनी पूर्वी झालेल्या लेखनाचा थोडक्यात परामर्ष घेतला असून त्यांतील ऐतिहासिक दृष्टचा दृग्गोच्चर होणाऱ्या उणिवा दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. शिवाय अशा प्रकारचे लेखन होण्यामागील हेतू स्पष्ट केला आहे. आज उपलब्ध असणारी सर्व साधनेही त्यावेळी शेजवलकर, सरदेसाई वा वासुदेवशास्त्री खरे यांनी उपयोगात आणली नाहीत. तसेच शेजवलकर वा अन्य मराठी इतिहासकारांनी या लढाईकडे एका विशिष्ट संकोचित दृष्टिकोनातून पाहिले, त्यामुळे त्यांनी या लढाईच्या दूरगामी परिणामांकडे दुर्लक्ष केले; पण यातूनच पुढे ब्रिटिश सत्ता फोफावण्यास मदत झाली आणि मराठा सत्तेचा ऱ्हास आला. प्रस्तावनेत, लेखकांनी आपण कोणती अप्रकाशित साधनसामग्री उपयोगात आणली, याची माहिती दिली आहे.

अनुक्रमणिका

द निझाम-मराठा रिलेशन्स (पृ. १-१५) या प्रकरणात हैदराबाद संस्थानच्या स्थापनेपासून म्हणजे इ. स. १७१३ पासून निझाम-मराठे संबंधाचा धावता आढावा दिला असून नारायणरावाच्या मृत्यूनंतर बारभाई कारभारी मंडळ निझामाकडे मित्रत्वाच्या नात्याने पाहू लागले. मराठामंडळात यावेळी सत्तेसाठी सरदारांत स्पर्धा चालू होती. याचा योग्य तो फायदा निझामाने उठविला; परंतु निझामाचा दिवाण रुक्नउद्दौलाच्या खुनानंतर अझिम-उल्-उम्र याची निझामाने दिवाणपदी नेमणूक केली. त्याने बहुतेक सर्व सूत्रे आपल्या हाती घेऊन निझामाला आपल्या हातातील बाहुले बनविले आणि पेशव्यांविरुद्ध कारस्थानास प्रारंभ केला. साहजिकच यातून तणाव वाढून त्याची परिणती खडर्याच्या युद्धात झाली. ही सर्व पूर्वपीठिका लेखकाने या प्रकरणात सुमारे ८० वर्षांचा आढावा देऊन र्चाचली आहे.

'द अलायन्स अँड पार्टिंग' (१७८४-१७९४) या सुमारे १६ ते ३५ पृष्ठांच्या प्रकरणात निझाम, मराठे, हैदरअली व ब्रिटिश या चार तत्कालीन सत्तांच्या लष्करी बळाचा आढावा दिला असून निझाम हीच या सर्वांतील कमकुवत शक्ती होती असे अनुमान काढले आहे. आणि अँग्लो-मराठा तीन युद्धांनंतर ब्रिटिशांनी टिपूला कसे बाजूला काढण्याचे ठरविले आणि महादजी शिंदेच्या उत्तरेकडील मोहिमांकडे दुर्लक्ष केले. यातून टिपूचा पराभव झाला. या सुमारास महादजी शिंदे व हरिपंत फडके या मराठामंडळातील दोन मातब्बर व्यक्ती निधन पावल्या. त्यामुळे साहजिकच निझामाची अशी समजूत झाली की, मराठ्यांचे लष्करी सामर्थ्य आता संपुष्टात आले. यामुळे निझामाने मराठ्यांना चौथव सरदेशमुखांची रक्कम देणे बंद केले. याशिवाय मीर अलमची शिष्टाई या संदर्भात अयशस्वी झाली.

'मार्च टू खर्डा' (पृ. ३६-५०) या प्रकरणात लेखकांनी खडर्याच्या दिशेने दोन्ही सैन्यांनी केलेल्या हालचाली, त्या सैन्यांतील दारूगोळा, सेनापती, प्रत्यक्ष लष्करी सामर्थ्य यांची वस्तुस्थितिनिदर्शक परिस्थिती थोडक्यात मांडली असून प्रकरणाच्या शेवटी खडर्याच्या लढाईचा तत्कालीन नकाशा (१७९५) छापला आहे. येथे एक वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट वाचकाच्या निदर्शनास येते ती म्हणजे मराठी सैन्याची खडर्याकडे आगेकूच चालू असताना मराठे सैन्यातील पेंढारी-बेरड या टोळ्यांची लुटालूट ही होय.

'द कॉन्फ्रन्टेशन' (पृ. ५१-६३) या प्रकरणात दोन्ही सैन्यांचे डावपेच आणि प्रत्यक्ष युद्ध याचे वर्णन असून मराठ्यांचे युद्धकौशल्य व डावपेच यांची थोडक्यात मीमांसा दिली आहे. यात लढाईच्या मूळ नकाशाचे इंग्रजी लिप्यंतर उद्धृत केले असून निझामाच्या अपयशाचे सर्व खापर निझामाचे स्वतःचे धोरण आणि त्याचा सल्लागार दिवाण अझिम-उल्-उमरा यांच्याकडे जाते, असे स्पष्ट मत लेखकांनी नोंदविले आहे. यात निझामाचे सैन्य व सेनापती यांचा कोणताही प्रमाद नव्हता.

'निगोशिएशन्स अँड पीस ट्रीटी' (पृ. ६४-७६) या प्रकरणात निजाम-मराठे यांतील युद्धविरामाची बोलणी आणि त्यांतून निष्पन्न झालेल्या तहाच्या वाटाघाटी यांची साक्षेपी चर्चा केली आहे. यात मराठ्यांची निझामाकडे अझिम-उल्-उमरा या दिवाणास- जो या सर्व युद्धास कारणीभूत ठरला, - काढून टाकावे ही प्रमुख मागणी होती; तथापि या तहाची सर्व अधिकृत प्रत आजमितीला उपलब्ध नाही. अखेर निझामाने चौथ-देशमुखीचे रु. तीन कोटी वर्षास एक हप्ता याप्रमाणे देण्याचे कबूल केले. परंतु त्याने दिवाणाच्या बाबतीत चालढकल केली. अखेर २७ मार्च १७९५ रोजी निझामाने अझिम-उल्-उमराला मराठ्यांच्या ताब्यात दिले.

'द अफ्टरमॅथ अँड रिॲप्रायझल' (पृ. ७७-१००) या प्रकरणात या लढाईचे मूल्यमापन लेखकांनी केले असून या लढाईच्या निमित्ताने सर्व मराठी सरदार भगव्या झेंड्याखाली एकत्र आले; पण या विजयाचा योग्य तो उपयोग मराठामंडळाला करून घेता आला नाही. त्यामुळे पुढे हळूहळू मराठी राज्याची वाताहात होऊन इंग्रजांचे पाय या देशात पक्के रोवले गेले. अजिम-उल-उमरा याला कैदी म्हणून आणले, पण त्याच्यावर पूर्ण वचक ठेवण्यात मराठा कारभाऱ्यांची कुचराई झाली. त्यामुळे येथील शिथिल प्रशासनाचा त्याने फायदा उठविला आणि दुसरा बाजीराव यास पेशवेपदासाठी उद्युक्त केले, याचा परिणाम अखेर मराठेशाहीच्या ऱ्हासात झाला.

अनुक्रमणिका

हे पुस्तक इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण असून मराठ्यांच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यास अत्यंत उपयुक्त आहे. एक संशोधनपर चिकित्सक ग्रंथ म्हणून ते संग्रही असावे, असे खचितच वाटते.

– सु. र. देशपांडे

---

**'आपले काम आपले जीवनसर्वस्व'– स. आ. सप्रे,** नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया, नवी दिल्ली; १९८०; पृ. ८५; किं. १२ रुपये.

---

महाराष्ट्र राज्य शासकीय मुद्रण व लेखनसामग्री विभागाचे सेवानिवृत्त संचालक श्री. स. आ. सप्रे यांनी 'आपले काम आपले जीवनसर्वस्व' या पुस्तकात कर्मयोगाचे महत्त्व पटवून दिलेले आहे. कर्मयोग ही गीतेची शिकवण आहे. मनुष्य जर सतत कार्यरत राहिला तरच त्याचा व समाजाचा विकास होऊ शकतो. त्याचे मन निरोगी राहते, नीतिधैर्य टिकून राहते. प्रत्येक क्षेत्रातील शिस्तबद्ध व निष्ठापूर्वक काम हाच आधुनिक संस्कृतीचा पाया आहे व तोच दारिद्र्य नष्ट करण्याचा एकमेव मार्ग असा मोलाचा संदेश त्यांनी दिलेला आहे. श्री. सप्रे यांनी यापूर्वीही व्यवस्थापनशास्त्रावर अनेक पुस्तिका प्रसिद्ध केलेल्या आहेत.

कामाचे महत्त्व विशद करण्यासाठी अनेक मनोरंजक उदाहरणे त्यांनी या पुस्तकात दिलेली आहेत. आज आपल्या समाजात कामाकडे लोक तुच्छतेने पाहतात, वैफल्याने ग्रासलेले दिसतात. 'कमी काम, अधिक दाम व आराम' या तत्त्वाचा पुरस्कार करणाऱ्यांची संख्या झपाट्याने वाढत आहे. परंतु कमी काम करून किंवा उपभोगांची लयलूट करून खरी मनःशांती व सुख लाभत नाही, तर ते एक सुव्यवस्थित सातत्याने केलेल्या अर्थपूर्ण कामाचे फलित असते. कामामुळे कंटाळा, दुर्गुण व दारिद्र्य या तीन मोठ्या अरिष्टांचे निवारण होऊ शकते. हे पटवून देण्यासाठी त्यांनी व्हॉल्टेअर या फ्रेंच साहित्यिकाच्या 'कांदिद' या कादंबरीतील वैशिष्ट्यपूर्ण उदाहरण दिलेले आहे.

आधुनिक व्यवस्थापनशास्त्राप्रमाणे काम ही एक खेळ व विश्रांतीइतकीच नैसर्गिक गोष्ट मानली जाते. सर्वसामान्य माणसाला कामाचा तिटकारा असतो हा दृढ समज खरा नाही. एखादी व्यक्ती जेव्हा अधिक जोमाने काम करते, तेव्हा तिची शारीरिक व मानसिक परिस्थिती उत्तम असते हे उघड आहे. आपली प्रगती व आपला विकास यांचे मोजमाप करण्याची काम ही एक वस्तुनिष्ठ अशी फूटपट्टी आहे. अनेकदा लोक कामाबद्दल अनास्था का दाखवितात याचे उत्तम विवेचन श्री. सप्रे यांनी केलेले आहे व अशी अनास्था घालविण्यासाठी व व्यक्तीमधील नैसर्गिक प्रवृत्तीचा विधायक कार्याकरिता उपयोग करून घेण्यासाठी सामाजिक संस्थांनी प्रयत्न केले पाहिजेत असे प्रतिपादन केलेले आहे.

विश्रांतीचे सौख्य कामामुळेच लाभते. केवळ विश्रांतीची तरफदारी करणाऱ्यांविरुद्ध श्री. सप्रे यांनी टीकास्त्र सोडले आहे. जो मनुष्य वैफल्याने ग्रासलेला आहे तो फुरसतीच्या वेळी सुखी व आनंदी असणे शक्यच नाही. फुरसतीचा वेळ अधिक असेल तर त्यापासून आनंद मिळण्यापेक्षा विकृतीच निर्माण होऊ शकते; माणूस दुर्गुणी होण्याची शक्यता वाढते व त्याचा स्वतःवर ताबा राहत नाही. त्याबरोबरच खूप थकवा येईल इतके काम असल्याखेरीज माणसाला खरोखर विश्रांतीचा आनंद मिळत नाही. काम जितके अधिक कष्टाचे, तितकी विश्रांतीची गोडीही जास्त असते. आणि यासाठी व्यक्तीला जर फुरसतीचा आनंद लुटायचा असेल, तर त्याने परिश्रमपूर्वक काम केले पाहिजे याचे सुंदर विवेचन त्यांनी केलेले आहे. प्रत्येकाला आपले काम शिस्तबद्ध व आकर्षक पद्धतीने कसे करता येईल याचीही उदाहरणे त्यांनी दिलेली आहेत. प्रत्येकाला आपण जेथे काम करतो तेथे योग्य महत्त्व मिळाले व कामाच्या व्यवस्थापनात सहभागी केले गेले, तर त्याला मोठे आंतरिक समाधान लाभते. काम सुंदर असू शकते व अगदी नेहमीच्या गोष्टी सुंदर रीतीने करणे शक्य आहे. त्यासाठी कल्पकता व सुव्यवस्थितपणाची गरज आहे.

कोणतेही काम सर्जनशील असू शकते. मनुष्य जेव्हा एखादी नवी उपयुक्त किंवा सुंदर गोष्ट

निर्माण करतो, तेव्हा त्याला परमानंद होतो. अशी सर्जनशीलता सर्व क्षेत्रांत व सर्व थरांवर शक्य असते. कामामुळे आत्मसाफल्य शक्य होते व एकसारख्या बदलणाऱ्या व वाढणाऱ्या गरजा काही प्रमाणात का होईना भागवता येतात. मॅस्लॉच्या सुप्रसिद्ध मानवी गरजांच्या श्रेणीच्या कळसावर आत्मसाफल्य आहे. आत्मसाफल्य याचा साधा सरळ अर्थ असा– आपल्या अंगातील गुणांचा जास्तीत जास्त विकास साधण्याची सततची प्रक्रिया. याशिवाय देशाच्या विकासातील कामाचे महत्त्व, बाह्य सुखसोयींचा व परिस्थितीचा कामावर होणारा परिणाम व त्या संदर्भात हृरसबर्ग व मॅकग्रेगर या व्यवस्थापन-शास्त्रज्ञांचे विचार मांडलेले आहेत.

अशा रीतीने कामाचे महत्त्व अत्यंत सोप्या आणि रसाळ भाषेत सर्वसामान्य माणसाला पटवून देण्याचा स्तुत्य प्रयत्न श्री. सप्रे यांनी या पुस्तकात केलेला आहे. अनेक दृष्टींनी अपूर्ण असलेल्या माणसाला अर्थपूर्ण कामामुळेच पूर्णत्व येऊ शकेल या प्रमुख विचाराला त्यांनी या पुस्तकात प्राधान्य दिलेले आहे. भारताचे दारिद्र्य इतके सर्वव्यापी आहे, की राष्ट्रीय दृष्टिकोणातून विचार करता आज सर्वांत तातडीची गरज आहे ती प्रत्येकाने आपले काम निष्ठेने व सुव्यवस्थितपणे करण्याची. आजच्या सामाजिक व आर्थिक विपन्नावस्थेत श्री. सप्रे यांचे विचार निश्चितपणे प्रेरक ठरतील असे वाटते.

– ज. सु. चौधरी

---

# वाचकांचा पत्रव्यवहार

संपादक नवभारत ह्यांस –

स. न. वि. वि.

मराठी तत्त्वज्ञान महाकोशात, चार्वाकांच्या मतांचे वेदांत खंडन केले असल्याने तो वेदकाळा-पेक्षाही जुना मतप्रवाह असल्याचे निवेदिले आहे. पण केवळ वेदांत त्या मतांचे खंडन आले यावरून तो विचारप्रवाह वेदपूर्वकाळातील होता असे म्हणणे चुकीचे ठरेल. आजवर 'नवभारत' मधील अनेक लेखांतून प्रा. आ. ह. साळुंखे यांनी चार्वाकमताचा आद्यप्रवर्तक जो बृहस्पती तो वेदकाळातीलच होता हे अनेक उदाहरणांनी स्पष्ट केले आहे. त्यामुळे तत्त्व-ज्ञान महाकोशातील या मतास थोडी मुरड घालावी लागते. हा मतप्रवाह वेदकाळापूर्वीचा नसून वेद-काळातीलच– म्हणजे एका बाजूला वेद लिहिले ( ? ) जात होते आणि दुसऱ्या बाजूला चार्वाक मतप्रवाह रुजू लागलेला होता–नव्हे तो रुजवण्या-साठी अपमानित बृहस्पतीने आक्रमक पवित्रा घेतला होता. अर्थातच त्याची मते वेदविरुद्ध असल्याने वेदांनी त्यांचे खंडन केले.

केवळ वेदोक्त मते नसल्यानेच ते वैदिक तत्त्वज्ञान ठरत नाही, वेदकाळातील ठरते.

चार्वाकांचे तत्त्वज्ञान इहवादी म्हणण्यापेक्षा भोगवादी म्हणूनच सामान्यांना ठाऊक असते. चार्वाकांना देव, पुनर्जन्म, कर्मविपाक मान्य नाही. आत्मा वगैरे ते नाकारतात. देह जिवंत असेपर्यंतच सर्व, पुन्हा काहीही नाही. म्हणून या जन्मात भोगता येतील तेवढी सुखे भोगा, मजा करा, आनंदाने जगा. असे चार्वाक सांगतात एवढेच ठाऊक असते. ऋण काढून सण करायला सांगणारा एक अवलिया तत्त्वज्ञ म्हणूनच चार्वाक ज्ञात आहे.

चार्वाकांनी केवळ वरील गोष्टीच मांडल्या नसून प्रा. साळुंखे यांनी दाखवून दिल्याप्रमाणे त्यांच्या तत्त्वज्ञानात समाजोपयोगी, हितकर अशाही किती तरी गोष्टी आहेत.

समाज उद्ध्वस्त होण्यापेक्षाही तो चांगल्या रीतीने अस्तित्वात रहावा यासाठी good deeds, administration आणि benevolent government या गोष्टींचीही त्यांना नुसती जाणीवच नव्हती, तर तो त्यांच्या तत्त्वज्ञानातील अविभाज्य भाग होता. कष्ट करून पैसा मिळवावा, प्रसंगी कर्जही काढावे ह्या नैतिक अर्थसिद्धांताचीही

त्यांना जाणीव होती–दंडनीती, वार्ता, बुद्धिप्रामाण्य या त्यांच्या जमेच्या बाजू होत.

चार्वाकांच्या मतातील जमेच्या बाजू ध्यानात घेतल्यावरच त्यांच्या पराभवाचे आश्चर्य वाटू लागते.

**चार्वाकमताचा पराभव का?**

दंडनीती, वार्ता यांची उत्तम जाण, बुद्धिप्रामाण्य हे चार्वाकांच्याकडे असूनही काळाच्या ओघात चार्वाक लुप्त का झाले? खरे तर चार्वाक इहवादी होते– ते प्राचीन काळातील वैज्ञानिक होते. मग आजच्या वैज्ञानिक प्रगतीच्या काळात त्यांचे तत्त्वज्ञान लोकमान्य व्हायला हवे. तसे न होता इ. सनाच्या सोळाव्या शतकातही अकबराच्या दरबारी असणारे व आपल्या मतांच्या प्रामाण्याबद्दल वाद घालणारे चार्वाकांचे अनुयायी वैज्ञानिक प्रगतीबरोबर उलट कमी-कमीच होत गेले हे कसे?

दुसरी गोष्ट अशी– ‘ लोकायतदर्शन ’ हे चार्वाक विचारधारेचेच दुसरे नाव काय सुचवते? बृहस्पतीने – ‘ लोकातून आणलेले मत ’ म्हणजे लोकायत. मग जर हे सर्वसामान्य लोकांचेच मत होते तर लोकांना अजिबात मान्य नसणाऱ्या वैदिक मतांचा प्रभाव लोकांच्या मनावर अधिक कसा पडला? वेदकाळातही ह्या खोट्या मोक्षसिद्धांतापेक्षा ही लोकांची मतेच जास्तीत जास्त लोकांना प्रिय वाटायला हवी होती. पण तसे झाले नाही. ती केवळ काही काळपर्यंत व काही प्रमाणातच तग धरून राहिली. असे का?

तिसरी गोष्ट – चार्वाकांची मते वैदिक काळापासून अस्तित्वात होती आणि सोळाव्या शतकापर्यंत त्यांचा एक जिवंत प्रवाह टिकून होता. अल्प-स्वल्प का होईना, पण होता. पुढे भौतिक प्रगतीच्या काळातच, नेमकी बुद्धिप्रामाण्याच्या युगातच ही बुद्धिप्रामाण्यवादी विचारधारा लोप पावावी ही विसंगतीच नव्हे काय?

या विसंगतीची, पराभवाची वरवर पाहता काही कारणे संभवतात ती अशी —

(१) सृष्टीच्या निर्मितीविषयीचे सर्वच सिद्धांत आजवर अपुरे ठरत आलेले आहेत. अगदी डार्विनचा सिद्धांतही प्राण्यांच्या उपपत्तीविषयी, उत्क्रांतीविषयी सांगणारा असला, तरी सृष्टिनिर्मितीचे गूढ तसेच राहिले आहे.

हे विश्व कसे निर्माण झाले? ग्रह–तारे कुठून आले? त्यांचे गुरुत्वाकर्षणादी गुणधर्म त्यांना कसे प्राप्त झाले? हे कुठे संपते? कुठे सुरू होते? म्हणजे याचा विस्तार किती? कोणत्या क्षणी हे चक्र सुरू झाले? आणि कधी संपणार? या सर्व प्रश्नांची उत्तरे कोणताही सिद्धांत देऊ शकला नाही. जगातील कोणत्याही लहानात लहान वस्तूलाही कुणी ना कुणी कर्ता–करविता असतोच; मग ह्या अत्यंत नियमबद्ध व अतिव्याप्त चक्रास कोणीतरी सूत्रधार असलाच पाहिजे असे म्हणून अनेकांनी एका अदृश्य शक्तीचे, परमेश्वराचे अस्तित्व गृहीत धरले. तो सहजासहजी दिसत नाही, त्याची नजर सर्वांवर असते, तुम्हाला त्याचे दर्शन हवे असेल तर सत्कृत्ये करा असा उपदेश केला. सर्वसामान्यांना दिङ्मूढ करून टाकणारी ‘ सृष्टिनिर्मितीचे मूळ कारण कोणते? ’ ही समस्या असल्याने, सृष्टीच्या चमत्काराकडे बघून दिपून जाणेच त्यांच्यापुरते शिल्लक असल्याने या भव्यदिव्य सृष्टीपुढे आपण क्षुद्र व परावलंबी जीवन जगतो, भविष्यातील अज्ञात गोष्टींच्या दोऱ्या कोणत्या तरी एका जबर शक्तीच्या हाती असतात, त्यावरूनच आपला जन्म, आपले मरण ठरणार असते हे ठावकी असल्याने अज्ञाताचे हे भय नष्ट करणारे असे कोणतेही तत्त्वज्ञान सामान्यजनांना पटणेच इष्ट ठरते. त्यामुळे दोन गोष्टी साध्य झाल्या–

एक, या सृष्टीचे कोडे आपणाला कधीतरी सुटेल अशी आशा निर्माण झाली. आणि दोन, समाजाला शिस्त लावण्यासाठी, नीती शिकविण्यासाठी फार कष्ट घेण्याची गरज उरली नाही.

म्हणून सर्वसामान्यांना वैदिक मते या दिशाहीनतेत, भयग्रस्ततेत काही तरी दिलासा देणारी वाटली असावीत.

चार्वाक बुद्धिप्रामाण्यवादी असल्याने त्यांनी या अनुत्तरीत प्रश्नांपुढे सरळ सरळ शरणागती पतकरली. त्यांनी काही गोष्टी ‘ स्वभावसिद्ध ’ असतात असे गृहीत धरून टाकले. सृष्टीतील मूळ घटक व त्यांचे गुणधर्म त्यांनी गृहीतच धरले. खरे तर चार्वाकांचे सृष्टिनिर्मितीविषयीचे हे गृहीतकच सृष्टिनिर्मितीच्या इतर सिद्धांतांपेक्षा कमी दिशाभूल करणारे होते. मात्र यात मानवी मनाला

वाटणाऱ्या अज्ञाताच्या भीतीबद्दलचा कोणताही दिलासा नाही म्हणून सामान्यजनांना ते त्याच्या आश्रयाला जाण्याइतके श्रेष्ठ वाटले नसावे.

शिवाय असे काही गृहीत धरले, तरी ते घटक कुठून आले याची रुखरुख उरणारच असते.

दुसरी गोष्ट अशी की, परमेश्वर प्रत्यक्ष प्रमाण नसला तरी त्याचे कल्पनेतील अस्तित्वही शिस्त, नीतिमत्ता यासाठी मानवी जीवनावर अंकुश ठेऊन असते. त्याच्या– कल्पनेत का होईना– असण्याने सामान्यांच्या जीवनात सुरक्षितता वाढते म्हणूनही सर्वसामान्यांना परमेश्वर मानणारे विचारच अधिक स्वीकार्य वाटले असावेत.

(२) चार्वाकांच्या पराभवाचे दुसरे कारण 'ऋणं कृत्वा घृतं पिबेत्' सारखी त्यांची अतिरेकी (वरवर का होईना अतिरेकी) वाटणारी मते. विरोधकांनी सामान्यजनांची मते बदलण्यासाठी अशा मतांवर हल्ले चढवून चार्वाकांना उघडे पाडण्याचा सराईत प्रयत्न केला.

## आजच्या पराभवाची मीमांसा

आज तरी बुद्धिप्रामाण्याला महत्त्व आहे ना ? मग आज लोकांना चार्वाक आपले का वाटू नयेत ? याचे उत्तर खरे तर असे आहे की, आज चार्वाकच काय, पण लोकांना परमेश्वरही आपला वाटत नाही. जीवनाला विलक्षण गती प्राप्त झाली आहे. गरजांची विपुलता, कमी उत्पादन, लोकसंख्या, प्रदूषण यांतून असंख्य सामाजिक, नैतिक प्रश्न उद्भवलेले आहेत. धर्मतत्त्वांपासून, चिकित्सेपासून माणूस जगण्याच्या मूलभूत प्रश्नांकडे खेचला गेला आहे. हे जगल्यावर उद्भवणारे म्हणून गौण प्रश्न आहेत. त्यामुळे कोणत्याच धर्माचे धर्मग्रंथगत स्वरूप आज अस्तित्वात नाहीसे झाले आहे. धर्म-तत्त्वे किंवा कोणतीही तत्त्वे केवळ व्यक्तिगत पातळीवरच अस्तित्वात आहेत. कोणताही धर्म– मला त्यातील हे बरे वाटते, हे वाटत नाही– या पद्धतीनेच आपण स्वीकारीत आहोत. धर्मतत्त्व म्हणून आवश्यक असणाऱ्या काही गोष्टींना आपण फाटा देतो तर काही आवश्यक गोष्टी धर्मात नसूनही, किंवा निषिद्ध मानल्या असूनही आपण करतो. आज आपण सर्वजणच काही वेळा चार्वाक असतो तर काही वेळा वैदिक असतो, काही वेळा देव (आर्य) असतो तर काही वेळा राक्षस असतो. त्यामुळे आजचा चार्वाकांचा पराभव हा सर्व परा-भवांतील एक पराभव आहे.

आज महत्त्वाचा प्रश्न विजयाचा किंवा परा-भवाचा नसून इतर सर्व (?) मतांना आजच्या काळातही 'मी अमुक एक आहे' असे सांगणारे अनु-यायी आहेत, प्रचारक आहेत. पण ज्यांच्या आधारे सर्वसामान्यांच्या इतिहासाचीच पुनर्मांडणी करा-वीशी वाटते त्या चार्वाकांची मात्र कुणीच बाजू घेत नाहीत आणि त्यासाठी चार्वाकांच्या आणखी काही आक्षेपार्ह मतांचे स्पष्टीकरण व्हायला हवे.

## आणखी स्पष्टीकरण हवे

१) 'लोकायत' याचा संस्कृतीकोशात तीन प्रकारे अर्थ दिला आहे. त्यांतील तीन नंबरचा अर्थ असा– 'लोक म्हणजे इंद्रियविषय; त्यांना महत्त्व देणारे मत.' चार्वाकांनी नियमनापेक्षा इंद्रियभोगांना महत्त्व दिले. या भोगाच्या मर्यादा स्पष्ट व्हायला हव्यात.

२) 'ऋणं कृत्वा......'चे जसे सप्रमाण स्पष्टी-करण झाले तसेच वैदिकांनी हल्ला चढविलेले– 'अश्वस्यात्र हि शिश्नं तु पत्नीग्राह्यं प्रकीर्तितम् ।' हे मतही अधिक स्पष्ट व्हायला हवे.

यावर आक्षेप घेताना आर्यसमाजाचे प्रवर्तक श्रीस्वामीदयानंद सरस्वती यांनी असे सांगणारा चार्वाक हा मूर्ख होता असे म्हटले आहे (सत्यार्थ-प्रकाशः द्वादशसमुल्लासः पान २७० ).

३) अ : 'ततश्च जीवनोपायो ब्राह्मणैर्विहित-स्त्विह । मृतानां प्रेतकार्याणि न त्वन्यद्विप्रते क्वचित् ॥ '

मृतकार्ये केली जातात ती ब्राह्मणांच्या उप-जीविकेसाठीच असा चार्वाकांनी वैदिक ब्राह्मणांच्या कर्तृत्वशून्यतेने चालणाऱ्या उपजीविकेवर आक्षेप घेतला आहे.

ब : आज 'अहिंसा परमो धर्मः' असे आपले ब्रीद मिरवणारे आर्य यज्ञात बली देऊन हिंसेने देवतांना संतुष्ट करत होते; तेच खरे हिंसक होते असे चार्वाक म्हणतात –

तर उलट वैदिक म्हणतात – पशू मारून त्याचा होम करावा असे वेदादी सत्य शास्त्रांत कोठेही

अनुक्रमणिका

लिहिलेले नाही– मृतकांचे श्राद्ध व तर्पण करणे हे कपोलकल्पित आहे.

चार्वाकांची काय किंवा वैदिक काय कोणतीही मते आज ज्या स्वरूपांत पाहावयास मिळतात, अगदी तेच त्याचे मूळरूप आहे असे ठामपणे सांगणे कठीणच. तथापि अनेक ठिकाणचे अक्षर पुरावे ( वेगवेगळ्या संदर्भातील ) जमा करूनच हे सप्रमाण सिद्ध करता येईल. प्रा. साळुंखे यांच्यासारख्या प्रज्ञावंतांनी हेही करावयास हवे. – ता. रा. भोसले

---

संपादक, ' नवभारत मासिक ', वाई
यांस स. न. वि. वि.

आपल्या नोव्हेंबर ८१ च्या अंकात आलेला प्रा. ल. ना. चापेकर यांचा ' भारतीय साधु-संप्रदाय' हा माहितीपूर्ण लेख वाचनीय आहे. ह्या लेखात हंस कबीर किंवा परमहंस असा एक साधूचा पंथ सांगितला आहे ; परंतु त्याचे तसे नाव पडण्याचे कारण कळत नाही. ' शिवस्वरोदय शास्त्र ' ह्या नावाच्या पुस्तिकेत ' आपण श्वास सोडताना ' ह ' असा स्वर निघतो व श्वास आत घेताना 'स' असा स्वर निघतो असा उल्लेख असून ' हंस ' म्हणजे ज्याने श्वासोच्छ्वासावर ताबा मिळवला तो, व ज्याने संपूर्णपणे ताबा मिळवला तो ' परमहंस ' म्हणजे महानयोगी असे स्पष्टीकरण आहे तरी ह्या विधानाला काही अर्थ आहे काय ह्याचा खुलासा प्रा. चापेकरांनी केल्यास बरे होईल. श्री रामकृष्णांना ' परमहंस ' म्हणत ते ह्या दृष्टीने योग्यच वाटते

त्याचप्रमाणे डिसेंबरच्या अंकात श्रीमती संध्या काणे यांचा ' ताओ ऑफ फिजिक्स ' ह्या डॉ. काप्रा ह्यांच्या ग्रंथाची ओळख करून देणारा अत्यंत उत्कृष्ट लेख प्रसिद्ध केल्याबद्दल आपले अभिनंदन व लेखिकेचे मनःपूर्वक आभार. कारण असले तुलनात्मक लेख क्वचितच वाचावयास मिळतात. हा लेख वाचून विचारांना चालना मिळाली. विज्ञाननिष्ठ दृष्टिकोण व अध्यात्मवादी दृष्टिकोण ह्यांत जो एक प्रकारचा संघर्ष दिसून येतो, त्यामुळे विचारवंतांच्या मनांत गोंधळ निर्माण होतो. परंतु ' ताओ ऑफ फिजिक्स ' सारख्या ग्रंथांच्या वाचनामुळे तुलनात्मक विचार करण्याची सवय लागते व आपल्या जुन्या तत्त्वज्ञानाची हेटाळणी होणार नाही असेही वाटते. कळावे. – र. प्र. जोशी

---

## साभार पोच–

* ' महाराष्ट्राची सत्त्वधारा ' – संपा. गो. म. कुलकर्णी, वि. त्र्यं. शेटे; प्रकाशक दास्ताने रामचंद्र आणि कं. पुणे; १९८१; पृ. २८+३२०; किं. ५० रुपये.
* ' वटवाघळांच्या पारंब्या ' (कथासंग्रह) – विजय गं. वाकडे, मराठवाडा साहित्यिक मित्रमंडळ प्रकाशन, नांदेड; १९८१; पृ. ११४; किं. १२ रु.
* ' क्षितिजा ' (काव्यसंग्रह) – मधु जामकर, अंबेकर प्रकाशन, नांदेड; १९८१; पृ. ६३; किं. १० रुपये.
* पर्वोत्सव– फादर वालेस, अनु. गणेश नीलकंठ पुरंदरे; बोरा अॅण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि. मुंबई–२; १९८१; पृ. ९४; किं. ६ रुपये.
* शिवपुरीबाबा – जे. जी. बेनेट, अनु. गणेश नीलकंठ पुरंदरे; बोरा अॅण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि. मुंबई–२; १९८१; पृ. २२६; किं. २० रुपये.
* माओनंतरचा चीन – माधव गडकरी, श्री विद्या प्रकाशन, पुणे ; १९८१ ; पृ. १६४ ; किं. २५ रुपये.
* सार्वमत (कवितासंग्रह ) – फ. मुं. शिंदे, प्रोग्रेसिव्ह को-ऑप. पब्लिकेशन्स सोसायटी लि., अंगुरीबाग, औरंगाबाद ४३१००१ ; १९८० ; पृ. ४८ ; किं. १० रुपये.
* बांधिलकी – डॉ. सरोजिनी बाबर, समाज-शिक्षण माला, पुणे ३० ; १९८१ ; पृ. १९२ ; किं. ५ रुपये.

अनुक्रमणिका

# सार-संकलन

## रथ जमिनीवर टेकतो

आर्थिक क्षेत्रात भरारी घेण्याचा ( टेक-ऑफ् ) चीनचा संकल्प पाच वर्षेपर्यन्त स्थगित करण्यात आला आहे अशी घोषणा नुकतीच करण्यात आली आहे. मध्यम दर्जाचा आर्थिक विकास साधण्याची आशाही आता दुरावल्यासारखी दिसत आहे. पुढल्या शतकापर्यन्त हे साध्य गाठता येणार नाही असे राज्यकर्ते मान्य करू लागले आहेत. आजच्या स्पर्धेवर आधारलेल्या आंतर्राष्ट्रीय राजकारणात ह्या घटनांमुळे अनेकांना दिलासा वाटेल हे अगदी शक्य आहे. पण काही काळानंतर का होईना, चीन एक महाशक्ती म्हणून जगाच्या रंगभूमीवर वावरणार यात काही शंका नाही. हे अटळ असे भवितव्य आहे. दूरदृष्टीचे पाश्चात्त्य राजकारणी हे भवितव्य मान्य करून स्वतःच्या दृष्टीने अनुकूल असे वळण त्याला कसे देता येईल ह्याचा विचार करू लागले आहेत.

पाश्चात्त्यांच्या दृष्टीने चीनचे आजचे आर्थिक धोरण वास्तववादी आहे. चालू वर्षी चीनने नियोजनातील सरकारी गुंतवणूक ३० टक्क्यांनी कमी केली आहे आणि अंदाजपत्रकातील तूट गेल्या वर्षीच्या एक पंचमांशाएवढी होईल इतकी कमी केली आहे. हे कठीण उपाय आहेत, पण त्यांना पर्याय नाही अशी पंतप्रधान झाओ–झियांग यांची शिकवण आहे.

भांडवलदारी राष्ट्रांकडून घेतलेल्या कर्जाबरोबर काही भांडवलदारी तत्त्वेही अर्थव्यवस्थेत प्रविष्ट झाली आहेत. उदा. साम्यवादी व्यवस्थेत व्यक्तीला काम देण्याचा हक्क आणि जबाबदारी सरकारची असते. पण चीनमध्ये आता व्यक्तींना असा सरकारी सल्ला मिळतो, की तुझ्या सायकलवर चढ आणि कुठे काम असेल ते शोधून काढ. व्यक्तींनी, उपक्रमशीलता दाखवून, करण्यासारखे उद्योग शोधून सुरू करावे, विशेषतः समाजाला आवश्यक असलेल्या सेवा पुरवाव्या, म्हणजे उपलब्ध नोकऱ्या वाढतील, नोकऱ्यांसाठी सार्वजनिक उद्योगांवर अवलंबून राहू नये, कारण ह्या उद्योगांत अगोदरच प्रमाणाबाहेर भरती झाली आहे आणि त्यांचे उत्पादन कमी आहे, असे हे नवीन तत्त्वज्ञान आहे.

ह्याचा परिणाम म्हणून चीनमध्ये आतापर्यंत दडून राहिलेली बेकारी उघड झाली आहे. माओवादी अधिकारशाहीची पकड सैल झाल्यानंतर गुन्हेगारी, गुंडगिरी आणि बेशिस्त ह्या आधुनिक समाजाच्या व्यथाही चीनमध्ये आढळू लागल्या आहेत. चीनमध्ये असलेली नागरी बेकारी युरोप किंवा अमेरिकेमध्ये असलेल्या नागरी बेकारीपेक्षा अधिक आहे. आधुनिक तंत्रज्ञानाचे फळ असलेल्या उपभोगाच्या झगमगीत वस्तू जेव्हा चीनमध्ये आयात होऊ लागल्या, तेव्हा दीर्घ उपासानंतर जी आधाशी वृत्ती निर्माण होते ती चीनमध्ये दिसून आली. ह्या वस्तू उपलब्ध करून दिल्यानंतर, तुम्ही उत्पादन वाढवा, मग तुमचे वेतन वाढविता येईल आणि त्यातून तुम्ही ह्या वस्तू खरेदी करू शकाल असे लोकांना सांगता येईल व ते त्यांच्या गळी उतरेल अशी कल्पना होती. म्हणजे ह्या वस्तूंच्या आमिषाचा वापर करून उत्पादकता वाढवता येईल अशी आशा होती. पण प्रत्यक्षात वेगळा परिणाम झाल्याचे आढळून आले. उत्पादकता वाढण्याऐवजी भ्रष्टाचार वाढला. उदा. कारखाने संगनमत करून कर चुकवितात आणि जो लाभ होतो तो सर्वांमध्ये वाटतात. पक्षाचे अधिकारी सार्वजनिक जमिनीवर खाजगी घरे बांधतात आणि सार्वजनिक पैशांनी खाजगी गाड्या विकत घेतात. नैसर्गिक आपत्तीसाठी म्हणून देण्यात आलेली मदत गिळंकृत करण्यात येते. ह्या वर्षाच्या पहिल्या आठ महिन्यांत ८० लक्ष डॉलर्स एवढ्या किंमतीची विजेच्या वितरणाची सामग्री चोरण्यात आली, अशा १२,००० चोऱ्या झाल्या असे वीज-मंडळाने कळविले आहे.

चीनमधील तीन दशकांच्या साम्यवादी राजवटीचे तीन आधार होते. विचारप्रणाली (आयडि-

ऑलॉजी) पक्की होती, पक्षसंघटना भक्कम होती आणि शासकीय नियंत्रण कडक होते. आज विचार-प्रणाली अस्थिर झाली आहे, पक्ष नाउमेद झाला आहे आणि शासकीय निमंत्रण ढिले झाले आहे. सामाजिक जीवनाला शिस्त लावील असे पर्यायी अधिकारकेंद्र अस्तित्वात आलेले नाही. कारखाने आणि शेतकरी यांना अधिक स्वायत्तता देण्याचे चिनी धोरण परिणामकारक ठरले आहे. शासकीय नियंत्रणाखाली असलेले कारखाने व शेती यांच्यापेक्षा स्वायत्त कारखाने व शेती यांचे उत्पादन डोळ्यांत भरेल इतके अधिक आहे. पण खुल्या बाजाराच्या तत्त्वावर आधारलेल्या अर्थव्यवस्थेकडून जी अपेक्षित फळे असतात, ती चांगल्या प्रकारे पदरात पडायची असतील तर ह्या अर्थव्यवस्थेवर फार बंधने घालून चालणार नाही. अर्थव्यवस्थेच्या बाबतीत हे जसे खरे आहे, तसेच ते बौद्धिक जीवनाच्या बाबतीतही खरे आहे. सर्जनशील बौद्धिक जीवन पक्षशिस्तीच्या बडग्याखाली बहरू शकत नाही. तेव्हा चीनला निवड करावी लागेल. समग्र जीवनाचे नियंत्रण करणारी जुनी हुकमत तरी परत प्रस्थापित करावी लागेल किंवा स्वातंत्र्यापासून जे फायदे लाभू शकतात त्यांच्यासाठी स्वातंत्र्याचे क्षेत्र वाढविण्यात जे धोके असतात, ते पतकरावे लागतील.

आजचे डेंगवादी राज्यकर्ते हे धोके पतकरायला तयार आहेत असे दिसते. पण ह्यासाठी त्यांची राजकीय बैठक भक्कम असायला हवी. स्वतःचे राजकीय स्थान बळकट करण्यासाठी आवश्यक असलेले राजकीय कौशल्य डेंग यांच्याकडे पुरेसे आहे असा अनुभव आहे. आवश्यक तेथे माघार घेऊन, कधी-कधी पराभव पतकरून महत्त्वाच्या सर्व लढाया त्यांनी जिंकून दाखविल्या आहेत. उदा. लाल सैन्यावर टीका, कित्येक कवींवर व नाटककारांवर टीकेची झोड उठवायची मुभा त्यांनी दिली आणि तिच्या बदल्यात संरक्षणावरील खर्च २५ टक्क्यांनी कमी केला. पक्षाच्या अधिकाऱ्यांना सुटीचे दिवस सार्वजनिक संडास-मुताऱ्या स्वच्छ करण्यासाठी खर्च करावे हा नियम परत जारी केला. त्याच्या बदल्यात ग्रामीण 'कम्यून्स'चे विसर्जन ते घडवून आणतील असा अंदाज आहे.

डेंगवाद्यांना पुरेसा अवसर मिळण्यासाठी एका गोष्टीची आवश्यकता आहे. चालू योजनेचे, वार्षिक चार टक्के वाढीचे जे लक्ष्य आहे ते जर साधले आणि पुरेशी परकी मदत मिळाली तर त्यांचा मार्ग बराच सुरळित होईल. चीनने परकी कंपन्यांवरील करांच्या कायद्यात नुकतीच सुधारणा जाहीर केली आहे आणि त्यामुळे परकी भांडवलाची आयात होण्याला उत्तेजन मिळेल. किनाऱ्याजवळील तेलाचे साठे शोधून काढण्यासाठी चीन लवकरच टेंडर्स मागविणार आहे. परकी भांडवलाच्या गुंतवणुकीसाठी ह्या क्षेत्राला अग्रक्रम देण्याचे चीनचे धोरण आहे. त्यानंतर आज अस्तित्वात असलेल्या उद्योगांची तांत्रिक सुधारणा करण्याची त्यांची योजना आहे. ह्या उपक्रमात पाश्चात्त्य भांडवल आणि तंत्रज्ञान जी महत्त्वाची भूमिका वठवतील तिच्यामुळे चीन आणि पाश्चात्त्य देश यांच्यामधील बंध बळकट होतील आणि ह्या जाग्या होत असलेल्या अजस्र राक्षसाला माणसाळवणे अधिक सुलभ होईल असे पाश्चात्त्यांचे दूरगामी आडाखे आहेत.

## पोलंड

लष्करी सत्ता येण्याआधी पोलंडची स्थिती कशी होती? पोलंडमधील पेचप्रसंगाला सुरवात होऊन १६ महिने लोटले आहेत. हिमवर्षाव होऊ लागला आहे. दिवसाचे काम आटोपल्यावर मग संध्याकाळी माणसांचे दुसरे काम सुरू होते. ते म्हणजे अन्नासाठी आणि इतर सर्व आवश्यक वस्तूंसाठी, थंडीत कुडकुडत रांगेत उभे राहणे. मिठासाठी रांग धरावी लागते, भाजीसाठी रांग धरावी लागते. ज्यांच्याशिवाय चालू शकते अशा सर्व वस्तूंच्या मोबदल्यात लोक ज्यांच्याशिवाय नडेल अशा वस्तू घेऊ लागले आहेत. सिगारेटी देऊन ते पेट्रोल घेतात, टेलिव्हिजन सेट देऊन गरम कोट घेतात. गुन्हेगारी ४२ टक्क्यांनी वाढली आहे. अंधारात डोक्यावर टोला लगावून माणसाला बेशुद्ध केले की त्याच्या पैशाच्या पाकिटावर झडप घालण्यात येत नाही, तर त्याचा लोकरी कोट काढून घेण्यात येतो. चलनवाढ भयानक आहे. दरडोई सरासरी मासिक कमाई २०८ डॉलर एवढी आहे. पण बुटाच्या एका जोडीला ४४० डॉलर पडतात. परिस्थिती स्फोटक आहे. संधिप्रकाशात दुकानादुकानांसमोर पसरलेल्या, थंडीत कुडकुडणाऱ्या


अनुक्रमणिका

ह्या लांब रांगा म्हणजे ठिणगी पडताच स्फोट होईल असे दारूचे कोठार ठरू शकल्या असत्या.

कामगार संघटनांचा संप करण्याचा हक्क 'तात्पुरता' काढून घेण्याची सरकारची इच्छा होती. सरकारने हे पाऊल उचलले असते तर राष्ट्र-व्यापी संप झाला असता. ज. यारूझेल्स्की, सॉलिडॅरिटीचे नेते वालेसा आणि आर्चबिशप ग्लेंप यांची नोव्हेंबर महिन्यात संयुक्त बैठक झाली होती. पण तडजोड होऊ शकली नाही. 'राष्ट्रीय समझौता आघाडी' स्थापन करावी असा सरकारचा मनसुबा होता. त्यामुळे पोलंडला 'संपविमुक्त हिवाळा' लाभला असता आणि परिस्थिती सुधारायला सुरवात झाली असती असा सरकारी अंदाज होता. पण कम्युनिस्ट पक्षाने संपावर बंदी घालावी अशी मागणी केल्यावर आणि अग्निशामक दलाच्या सैनिकांचा वापर करून एक संप फोडण्यात आल्या-नंतर सॉलिडॅरिटीच्या अध्यक्षमंडळाने 'राष्ट्रीय समझौता आघाडी'चा प्रस्ताव ३ डिसेंबरला एकमताने फेटाळून लावला.

स्थानिक निवडणुका मोकळेपणे घेण्यात याव्यात, रेडिओ-टेलिव्हिजन इ. माध्यमांत भाग घेण्याची सॉलिडॅरिटीला संधी व अधिकार असावा, आणि आर्थिक व्यवस्थापनात कामगार-संघटनांचा सहभाग असावा अशा सॉलिडॅरिटीच्या मागण्या होत्या. ह्या बाबतीत बोलणी सुरू करण्यापूर्वी 'राष्ट्रीय समझौता आघाडी' स्थापन झाली पाहिजे असा कम्युनिस्ट पक्षाचा आग्रह होता. ह्यावर "आम्ही कधीही न पाहिलेल्या मुलीशी लग्न करून आम्हाला संसार थाटायला सांगत आहेत" अशी सॉलिडॅरिटीची प्रतिक्रिया होती. पहिल्याने आर्थिक धोरणाविषयी बोलणी झाली पाहिजेत, अर्थव्यवस्थेवर देखरेख करणारी सामाजिक व आर्थिक मंडळे स्थापन केली पाहिजेत आणि अमान्य असलेला निर्णय नाकारायचा सॉलिडॅरिटीला अधिकार (व्हीटो) असला पाहिजे, अशी सॉलिडॅरिटीची भूमिका होती.

सॉलिडॅरिटीच्या २० टक्के सभासदांनाच संप नकोसे झाले आहेत असे मत–चाचणीवरून आढळून आले आहे. पण पक्षाचे जे मुरब्बी आणि चिवट पुढारी आहेत त्यांची खरी भीती संपाविषयीची नाही, सॉलिडॅरिटीची मुक्त निवडणुकीची मागणी आणि विशेषतः कारखान्यांतून कम्युनिस्ट पक्षाच्या अधिकाऱ्यांना हुसकावून लावण्याची त्यांनी उघडलेली मोहीम यांची त्यांना भीती वाटत होती.

पण कम्युनिस्ट पक्षच विघटित होऊ लागला आहे. जुलै महिन्यात झालेल्या पक्षाच्या काँग्रेसनंतर अनेक सभासदांनी पक्ष सोडून दिला आहे. स्वतः होऊन पक्ष सोडून दिलेल्यांची आणि ज्यांना काढून टाकण्यात आले आहे त्यांची मिळून ४००,००० इतकी संख्या भरेल. 'पक्षाला नवीन, अधिक प्रसन्न असा चेहरा द्या' असे आदेश स्थानिक पक्षशाखांना वरून देण्यात आले. पण त्यांची फारशी दखल घेण्यात आली नाही. "३५ वर्षे वरून आलेले आदेश निमूट-पणे पाळण्याची सवय जडल्यानंतर अनेकांनी स्वतः-च्या प्रेरणेने जी पहिली कृती केली ती म्हणजे सभासदत्वाचे कार्ड परत करण्याची होय" असे ह्या प्रतिसादावरील भाष्य आहे.

पण पक्षाला जे खिंडार पडते आहे ते सॉलिडॅरिटी व्यापू शकेल असे दिसत नाही. तिचे संघटन ढिले आहे. सॉलिडॅरिटीच्या नेतृत्वात वैयक्तिक बेबनाव आहे ही तितकीशी महत्त्वाची गोष्ट नाही. पण तिचे ४०,००० अधिकारी आणि स्थानिक काम समिती आहेत. ह्यामुळे नेतृत्वाचा तळाच्या कामगारांशी असलेला संबंध दुरावत जाईल अशी भीती आहे. उद्या मोकळेपणे निवडणूक झाली तर सॉलिडॅरिटी बहुमताने निवडून येईल अशी खात्री नाही.

राजकीय दृष्ट्या अपक्ष अशी कामगारसंघटना म्हणून सॉलिडॅरिटीने राहावे असा एक विचार आहे. तो कम्युनिस्ट पक्षाला प्रतिस्पर्धी असा पक्ष होऊ शकत नाही. पण त्यापूर्वी सध्याचा पेचप्रसंग सुटावा लागेल. कम्युनिस्ट सत्ता नष्ट झाली तर जी राजकीय पोकळी निर्माण होईल ती कशी भरून निघू शकेल ? अनेक ठिकाणी स्थानिक राजकीय 'क्लब' उदयाला येत आहेत. 'समाजवाद–विरोधी' असे ३५ 'क्लब' आतापर्यंत स्थापन झाले आहेत अशी कम्युनिस्ट पक्षाची मोजदाद आहे. सॉलिडॅरिटीलाही हे 'क्लब' नामंजूर आहेत. त्यांच्यामुळे ऐक्याला तडे जातात असे तिचे म्हणणे आहे. काही महिन्यांपूर्वी सॉलि-डॅरिटीला जो आत्मविश्वास होता तो आता ओसरू लागला आहे.









नियोजनकाराला चक्रावून टाकेल असे पोलिश अर्थव्यवस्थेचे स्वरूप आहे. उदा. १९८२ ची जी राज्य-योजना आहे ती एक नाही. तीन पर्यायी योजना संसदेपुढे मांडण्यात आल्या आहेत. तीन का? तर सबंध वर्षाचे आर्थिक चित्र खाण-कामगार किती दगडी कोळसा बाहेर काढतील यावर बहुतांशी अवलंबून असते. जर ह्या वर्षाएवढाच कोळसा पुढील वर्षी बाहेर पडला तर औद्योगिक उत्पादन आणखी दहा टक्क्यांनी घटेल असा अंदाज आहे. ह्यावर्षी ते अगोदरच १४ टक्क्यांनी घटले होते. जर १७.५ कोटी टन एवढ्या कोळशाचे उत्पादन झाले तर औद्योगिक उत्पादन ५ टक्क्यांनी वाढेल असा हिशोब आहे. काय घडले तर खाण-कामगार उत्पादन वाढवतील? सरकारी आर्थिक सल्लागारांचे म्हणणे असे आहे, की ह्याच्या तीन अटी आहेत. एक तर पोलिश चलनावर कामगारांचा विश्वास जो ढळला आहे तो परत बसला पाहिजे. ह्यासाठी नोटांची भेंडोळी छापून बाहेर काढणे थांबले पाहिजे. शेतीचे उत्पादन वाढले पाहिजे आणि उद्योगाचे लोकशाहीकरण झाले पाहिजे.

कागदी पैशाचा भरमसाट पुरवठा आणि मर्यादित उपलब्ध वस्तू यांच्या दरम्यान जी दरी आहे ती अनावश्यक, चैनीच्या वस्तूंच्या किंमतीत वाढ होऊन हळूहळू निरुंद होत जाईल. पण शेतीच्या उत्पादनात कशी वाढ करता येईल हा पोलिश अर्थव्यवस्थेपुढील यक्षप्रश्न आहे. जनावरांची संख्या रोडावल्यामुळे मांसाचा पुरवठा अतिशय कमी झाला आहे. सोळा महिन्यांपूर्वी जी जनावरांची संख्या होती तेवढी परत होण्यासाठी अनेक वर्षे लागतील. १९७९ साली प्रत्येक पोल सरासरी ७० किलो मांस खात होता. ह्यावर्षी तो ६२ किलो खाईल. रेशनच्या दुकानात मांसाचा पुरवठा कसा चालू ठेवता येईल ही संबंधित मंत्र्याची डोकेदुखी आहे. ख्रिसमसच्या सणाला मद्यमांसाचे सुग्रास भोजन लाभणे सर्वसाधारण पोलिश नागरिकाच्या नशिबी दिसत नाही. ह्यावर्षी नाही आणि पुढील अनेक वर्षे नाही.

---

## साभार पोच

* **मानवेन्द्रनाथ रॉय : व्यक्ती आणि विचार** – द्वा. भ. कर्णिक ; नव जागृती प्रकाशन ; मुंबई ४०००१६ ; १९८१ ; पृ. १६ + २८६ ; किं. १५ रुपये.

* **पंखांना ओढ पावलांची (नाटक)** – वसंत कानेटकर, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ; १९८१ ; पृ. ७३ ; किं. ६ रुपये.

* **वाटेवरच्या सावल्या** – वि. वा. शिरवाडकर ; कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ; १९८१ ; पृ. १६६ ; किं. १५ रुपये.

* **अप्पाजींची सेक्रेटरी (नाटक)** – वसंत सबनीस ; कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे : १९८१ ; पृ. ९६ ; किं. ६ रुपये.

---

अनुक्रमणिका

हे मासिक श्री. ग. दिक्षीत यांनी दि प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून
मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका






